शिक्षणखात्याचा मंजुरी-क्रमांक :
मराठी पापुमं/३२८६/बाभाम/१२६५२(१) स.
दिनांक २५ मार्च १९८६.





## मराठी



# बालभारती

## इयत्ता सातवी









महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम
संशोधन मंडळ, पुणे.

प्रथमावृत्ती : १९८६

पुनर्मुद्रण: १९९४

प्रकाशक : श्री. पी.वाय. साळवी
नियंत्रक,
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ,
मुंबई-400 018

कागद : ६१ × ८६ सेमी ६० जी. एस. एम. व्हाईट प्रिंटिग
या पुस्तकाचा कागद महाराष्ट्र राज्य शिक्षणखात्याने सवलतीच्या दरात उपलब्ध करून दिला आहे.

टाईप व फोटोसेटिंग : १६ पॉ. साधा. मे. श्रीरंग प्रिंटर्स, बी-४, श्रीराम इंडस्ट्रियल इस्टेट, जी. डी. आंबेकर मार्ग, वडाळा, मुंबई-400 031

मुद्रक : सरस्वती प्रिन्टर्स, ४१५, क्रीएटीव्ह इंड. इस्टेट, ना. म. जोशी मार्ग, मुंबई-११.

मुद्रणादेश : एन/पी.टी.जी./ टी.बी. ६०८९ १.०

# प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे.
सारे भारतीय माझे
बांधव आहेत.
माझ्या देशावर माझे प्रेम आहे.
माझ्या देशातल्या समृद्ध आणि
विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे.
त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता
माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन.
मी माझ्या पालकांचा, गुरूजनांचा
आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन
आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन.
माझा देश आणि माझे देशबांधव
यांच्याशी निष्ठा राखण्याची
मी प्रतिज्ञा करीत आहे.
त्यांचे कल्याण आणि
त्यांची समृद्धी
ह्यांतच माझे
सौख्य सामावले
आहे.

## प्रस्तावना

'बालभारती' च्या नव्या वाचनमालेतील हे इयत्ता सातवीचे पुस्तक आपल्या हाती देताना आम्हांला विशेष आनंद होत आहे.

सातवीचे हे पुस्तक इयत्ता सहावीच्या 'बालभारती'शी मिळते-जुळते व्हावे असा एक विशेष प्रयत्न यात केला आहे. हे पुस्तक शक्यतो निर्दोष व्हावे या हेतूने या पुस्तकाच्या चाचणी प्रती अनुभवी शिक्षक, शिक्षणतज्ज्ञ, प्रशिक्षण संस्था इत्यादींच्याकडे पाठवून त्यांचे अभिप्राय घेण्यात आले. त्यांनी केलेल्या सूचनांच्या संदर्भात मंडळाच्या मराठी-भाषा-समितीने आवश्यक ते संस्कार करून हे पुस्तक जास्तीत जास्त निर्दोष व अद्ययावत करण्याचा प्रयत्न केला आहे. आस्थापूर्वक घेतलेल्या परिश्रमांबद्दल मंडळ समितीचे आभारी आहे. तसेच अगत्याने अभिप्राय पाठवून ज्यांनी ज्यांनी या पुस्तकाच्या संपादनास हातभार लावला, त्यांचेही मंडळ आभारी आहे.

या पुस्तकाचे अध्ययन-अध्यापन प्रभावी होण्याच्या दृष्टीने या पुस्तकाची शिक्षकांसाठी हस्तपुस्तिका उपलब्ध करून देण्याची योजना विचाराधीन आहे. मंडळाच्या या नव्या उपक्रमाचे शिक्षकमित्र स्वागत करतील अशी अपेक्षा आहे.

संचालक,

पुणे :

दि. १ मे, १९८६ — महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती
वैशाख ११, १९०८ — व अभ्यासक्रम संशोधन मंडळ

'मराठी बालभारती इयत्ता सातवी' या पुस्तकाची 'शिक्षकांसाठी हस्तपुस्तिका' उपलब्ध आहे.

## अनुक्रमणिका

### गद्यविभाग





# १. 'आनंदभवन'मधले दिवस

**इंदिरा गांधी**

**इंदिरा फिरोझ गांधी** (जन्म : १९१७; मृत्यू : १९८४) भारताच्या माजी पंतप्रधान. अखिल भारतीय काँग्रेसचे अध्यक्षपद भूषवले होते. पं. नेहरू यांच्याप्रमाणे त्यांना अफाट लोकप्रियता लाभली. राजकीय व सामाजिक प्रश्नांसंबंधी इंग्रजीत लेखन.

'आनंदभवन' हे नेहरू घराण्याचे निवासस्थान. तेथेच इंदिराजींचे बालपण गेले. या उताऱ्यात त्यांनी आपल्या बालपणच्या आठवणी सांगितल्या आहेत.

**अलाहाबाद** किंवा पवित्र प्रयाग या उत्तर प्रदेशातल्या शहरात एक अतिशय प्रशस्त व प्रसिद्ध असं घर आजही उभं आहे. जुन्यापुराण्या वृक्षांच्या विस्तारणाऱ्या फांद्यांनी हे घर लोकांच्या नजरेपासून काहीसं लपवलेलं आहे.

माझे आजोबा पंडित मोतीलाल नेहरू यांनी हे घर विकत घेतलं आणि 'आनंदभवन' असं त्याचं नामकरण केलं. या घरातच माझा जन्म झाला. खेळायसाठी आणि लपाछपीसाठी त्यात विपुल जागा असल्यामुळं हे घर आम्हां मुलांना फार आवडत असे.

माझे आजोबा वकील होते आणि त्या काळात वकिलीत त्यांची खूप भरभराट होती. त्या भागातल्या सर्वांत बड्या व्यक्तींत त्यांची गणना केली जात असे. त्यांची बुद्धी तीव्र होती, अंतःकरण उदार होतं आणि प्रवृत्ती हौशी होती. ते खूप पैसा कमवत आणि खर्चही खूप करत. आमचं घर पाहुण्यांनी सदा भरलेलं असे. सरकारी अधिकारी, लेखक, कवी, इंग्रज असे तऱ्हेतऱ्हेचे लोक आमच्या घरी येत असत आणि राहत असत. रोज मेजवान्या होत आणि दादाजींच्या — माझ्या आजोबांच्या — हसण्यानं सारं घर दणाणून जाई.

१९२८ साली माझ्या आजोबांनी आमचं हे घर राष्ट्राला देणगी म्हणून अर्पण केलं आणि त्याचं पहिलं नाव बदलून 'स्वराज्यभवन' असं नवं नाव त्याला दिलं. आमचं घर आता राजकीय हालचालींचं केंद्रच बनत चाललं आणि त्याच्या जीवनातलं एक नवीन पर्व सुरू झालं. स्वातंत्र्याच्या आंदोलनातल्या अनेक महत्त्वपूर्ण घटना या वास्तूत घडल्या. या घराच्या भिंती बोलू शकल्या तर त्या कितीतरी रोमहर्षक हकीकती सांगतील.

आमच्या घरी नेहमीच लहानमोठ्या बैठकी नि सभा भरत. त्यांत होणारी भाषणं माझ्या कानावर पडत. त्यांतून मला एक खेळ सुचला आणि तो मला फार आवडू लागला. आमच्याकडं पुष्कळ नोकर-चाकर होते. त्यांतले मिळतील तेवढे मी गोळा करी आणि त्यांच्यापुढं टेबलावर उभं राहून मी भाषण करी. प्रौढ माणसांच्या बोलण्यातून ऐकलेलं त्या भाषणात मी सांगत असे. अर्थातच ते सारं तुटक तुटक असे, त्यात संगती अशी नसे.

सन १९२१ च्या सविनय कायदेभंगाच्या चळवळीत माझे आजोबा आणि वडील या दोघांनाही पकडण्यात आलं आणि त्यांना सहा महिन्यांच्या कारावासाची शिक्षा ठोठावण्यात आली. त्या वेळी मी चार वर्षांची होते. त्या कोवळ्या वयात मी न्यायालयात प्रथम गेले. आरोपीच्या पिंजऱ्यातच मी

दादाजींच्या मांडीवर बसले होते. त्यांच्या आणि माझ्या पिताजींच्या धरपकडीनंतर पोलीस 'आनंदभवन'ला वारंवार भेट देऊ लागले. माझे आजोबा, वडील आणि काही काळानंतर इतर कुटुंबीय मंडळी यांच्यावर दंडाची जी रक्कम लादण्यात आली होती ती वसूल करण्यासाठी पोलीस येत. दंडाची रक्कम आपण होऊन भरायची नाही असं काँग्रेसचं धोरण होतं, म्हणून आम्ही दंड भरला नव्हता. मग पोलीस अनेक दिवस आमच्या घरी येत राहिले आणि घरातलं फर्निचर जप्त करून नेऊ लागले. गालिचे, चांदीच्या वस्तू, मोटारगाडी यांचीही जप्ती होऊ लागली. दंडाच्या रकमेपेक्षा या वस्तूंची किंमत कितीतरी अधिक होती. सातत्यानं चाललेली ही लूट असहायपणं पाहत राहणं हे जबर इच्छाशक्ती असलेल्या माझ्यासारख्या लहान मुलीला सहन करता येण्याजोगं नव्हतं. मी पोलिसांना विरोध करू लागले. माझा निषेध शक्य त्या मार्गानं व्यक्त करत राहिले.

गांधीजींच्या आदेशानुसार सर्व देशभर परदेशी कपड्यांच्या होळ्या ज्या दिवशी पेटल्या, तो दिवस मला स्पष्टपणे आठवतो. त्या प्रसंगाची खळबळ आजही मी मनोमन अनुभवते. परदेशी कपड्यांच्या ढिगांनी भरून गेलेलं ते विस्तृत प्रांगण आताही मला दिसू लागतं. किती मूल्यवान आणि सुंदर सुंदर रंगांचे कपडे होते ते! मलमली, मखमली, रेशमी कपड्यांच्या ढिगांवर उड्या मारणं, त्यांत लपंडाव खेळणं ही आम्हां मुलांना केवढी मौज होती!

माझ्या आईवडलांवर माझी केवढी हुकमत होती याचा शोधही मला त्याच दिवशी लागला. परदेशी कपड्यांची होळी पाहायला घरातील प्रत्येक व्यक्ती जाणार होती; पण मला मात्र फार लहान समजून घरातच झोपवण्यात येणार होतं. याविरुद्ध मी दादाजींकडं दाद मागितली आणि त्यांनी माझी बाजू उचलून धरली. तेव्हापासून ते नेहमीच माझ्या बाजूनं उभे राहिले.

तथापि आम्ही प्रांगणात पोचतो न पोचतो एवढ्यात मला झोप लागली. परदेशी कपड्यांच्या रंगीबेरंगी पर्वतावर एक जळतं लाकूड फेकलं गेलं आणि ज्वालेची जीभ लवलवत पुढं सरसावली, एवढंच मी पाहू शकले.

गांधीजींनी सत्याग्रह, स्वदेशी आणि खादी यांचा संदेश दिला होता. त्याचा

मोठा प्रभाव माझे आजोबा व वडील यांच्यावर पडला. 'आनंदभवन'मधील मेजवान्या आता बंद झाल्या. खादी वापरणं सुरू झालं आणि ती खादी तरी कशी होती — खरखरीत, तरटासारखी जाडीभरडी. माझ्या आईचं तर सारं अंग त्या खादीनं सोलून निघालं; पण त्या पोशाखातही तिचं सौंदर्य आणि तिची कोमलता फुलासारखी उमलत राही.

माझ्या आईला दागिन्या-कपड्यांची मुळीच हौस नव्हती. लहानपणी ती आपल्या भावांबरोबर खेळे, धावे. ती नऊ-दहा वर्षांची होती त्या वेळी माझ्या आजोळची सर्व मंडळी काही दिवसांसाठी जयपूरला गेली होती. तिथं पडद्याची सक्त चाल होती. केवळ डोलीत बसूनच घराबाहेर जाता येईल, असं कमलाजींना — माझ्या आईला — सांगण्यात आलं. आजपर्यंत जिला हिंडण्या-फिरण्याचं पूर्ण स्वातंत्र्य होतं, ती अशा कैदेत कशी राहणार? माझ्या आईची मुद्रा उदासवाणी दिसू लागली. तिचं वजनही घटत चाललं.

मग मात्र तिची आई म्हणजे माझी आजी घाबरली आणि तिनं एक युक्ती शोधून काढली. त्या दिवसापासून माझी आई दररोज सकाळी आपल्या भावांचे कपडे चढवून आणि केस पगडीखाली लपवून भावांबरोबर फिरायला जाऊ लागली. कोणालाही हे गुपित कळून आलं नाही. आईच्या मनावर याचा मोठा परिणाम झाला आणि पुढं ती पडदा, गोषा यांच्या विरुद्ध सतत प्रचार करत राहिली.

माझ्या लहानपणी माझी आई मलाही मुलाचा पोशाख पुष्कळदा घाली. त्यामुळं लोक अनेकदा चकित होत. ते मला नेहमी विचारत, "तुझा भाऊ कुठं आहे?" मी उत्तर देई, "मला कुणी भाऊ नाही." त्यावर लोक म्हणत, "वा, आम्ही आमच्या डोळ्यांनी त्याला पाहिलंय ना!"

सदसद्विवेकबुद्धी आणि कर्तव्यभावना यांच्याशी आयुष्यातली पहिली भेट होण्याचा प्रसंग माझ्या बालपणी अकस्मात घडून आला.

माझ्या आईवडलांचं मी एकुलतं एक अपत्य असल्यामुळं मी एकटीच स्वतःशी खेळत बसे. माझी आई मला दृष्टीच्या टप्प्यात हवी असे. तिचं बोलणं मला ऐकायला येईल एवढ्याच अंतरावर मी खेळत असे.

एका संध्याकाळी पॅरिसहून परतलेल्या एक नातलग बाई आईला भेटायला आल्या. त्या बाईंनी कशिदा काढलेला, अतिशय सुंदर असा एक फ्रॉक माझ्यासाठी पॅरिसहून आणला होता. आईनं स्मित करत त्यांना तो परत दिला. 'आम्ही आता हातांनी कातलेल्या सुताचे आणि हातविणीचे कपडेच फक्त वापरतो,' असं तिनं त्यांना सांगितलं. त्या बाईंना ते मुळीच समजून घेता आलं नाही. आईनं घातलेल्या खरबरीत खादीच्या कपड्यांकडं त्या पाहतच राहिल्या. जिथं जिथं माझ्या आईची त्वचा खादीच्या साडीवर घासली गेली होती, तिथं तिथं ती हुळहुळी व लाल झाली होती, हे त्या बाईंच्या लक्षात आल्यावाचून राहिलं नाही. त्या ताडकन म्हणाल्या, "मला वाटतं, तुम्हां सर्वांना वेड लागलंय. तुम्ही प्रौढ आहात आणि तुम्हांला आजारी पडायचंच असेल, तर तो तुमचा प्रश्न आहे. पण तुमच्या छोट्या मुलीला वेदना सहन करायला लावायचा हक्क मात्र तुम्हांला नक्कीच नाही. हा फ्रॉक मी तिच्यासाठी भेट म्हणून आणला आहे."

"इंदू, इकडं ये," आईनं मला हाक मारली. "मावशीनं तुझ्यासाठी परदेशी फ्रॉक आणला आहे. फ्रॉक फार सुरेख आहे आणि तुला आवडला तर तू तो घालायला हरकत नाही. पण त्याआधी आपल्या सर्व परदेशी वस्तू ज्या होळीत आपण जाळून टाकल्या, ती आठव. घरातली आम्ही सर्व माणसं खादी वापरत असताना हा परदेशी सुंदर फ्रॉक घालणं तुला आवडेल का?"

त्या फ्रॉकची मोहिनी जबर होती. माझे डोळे त्याच्या अभिलाषेनं लुकलुकू लागले. त्याला स्पर्श करण्यासाठी माझा चिमुकला हात पुढं झाला; पण तो त्याच्यापर्यंत पोचण्याआधीच माझ्या तोंडून शब्द उमटले, "घेऊन जा हा फ्रॉक. मी तो घालणार नाही."

"पण का? तुला सुंदर वस्तू आवडत नाहीत काय?"

"मला सुंदर वस्तू आवडतात... हो, नक्कीच आवडतात... पण..." घरातल्या वडीलधाऱ्या मंडळीच्या बोलण्यातून माझ्या कानावर पडलेली, परदेशी वस्तू न वापरण्यामागची सर्व कारणं मी त्या बाईंना सांगू लागले.

त्यावर त्या म्हणाल्या, "ठीक ठीक, कुमारी संत! पण तुमची बाहुली



परदेशी आहे, ती हो कशी चालते तुम्हांला?"

माझी बाहुली माझा जीव की प्राण होती! ती बाहुलीच नव्हे, तर दुसरं कुठलंही खेळणं निर्जीव आहे, हा विचार मला सुचूच शकत नव्हता. माझ्या प्रत्येक खेळण्याला मी विशिष्ट नाव दिलं होतं आणि त्या प्रत्येकाचं विशेष अस्तित्व माझ्या लेखी होतं. ती बाहुली तर माझी मैत्रीण होती; नव्हे माझी मुलगीच होती!

नंतर अनेक दिवस उलटले. एकीकडं त्या बाहुलीविषयीचं माझं गाढ प्रेम, इतकी सुंदर वस्तू आपल्या मालकीची आहे याबद्दल मला वाटणारा अभिमान आणि दुसरीकडं माझ्या बालसमजुतीप्रमाणं देशासंबंधीचं माझं कर्तव्य यांच्यातला झगडा माझ्या मनात सतत चालू राहिला. मला खाद्यपदार्थांचा सोस असा कधीच नव्हता. त्या काळात तर मला त्यांचा तिटकाराच वाटत राहिला. माझ्या आईला वाटू लागलं, की मी कशानंतरी आजारी आहे.. आणि ते खरंच होतं.

अखेरीस माझ्या मनाचा निर्णय झाला. मानसिक ताणानं थरथर कापत मी ती बाहुली आमच्या घराच्या गच्चीवर घेऊन गेले आणि ती पेटवून दिली. त्या बाहुलीनं पेट घेताच माझ्या डोळ्यांतून अश्रू ओघळू लागले — जणू काही ते कधीच संपणार नव्हते.

## शब्दार्थ व टिपा :

**आंदोलन** —चळवळ; लढा. **वास्तू** —इमारत. **रोमहर्षक** —मन थरारून टाकणारे. **संगती** —योग्य क्रम. **निषेध** —एखाद्या गोष्टीबद्दल दाखवलेला विरोध **प्रांगण** —मोठा परिसर. **सदसद्‌विवेकबुद्धी** —योग्य कोणते व अयोग्य कोणते याचा निवाडा करणारी बुद्धी. **मोहिनी** —ओढ; आकर्षण. **अभिलाषा** —लोभ; प्राप्तीची तीव्र इच्छा.

**जीव की प्राण असणे** —अत्यंत प्रिय असणे.

**सविनय कायदेभंग** —ब्रिटिशांचे जुलमी कायदे सत्याग्रह करून मोडायचे, त्याबद्दल होणारी शिक्षा आनंदाने सोसायची आणि अशा रीतीने परकीय सत्तेला विरोध करायचा या हेतूने म. गांधींनी १९२१ साली सुरू केलेली चळवळ.

## प्रश्न :

१. 'आनंदभवन' सदैव पाहुण्यांनी का गजबजलेले असे?
२. छोट्या इंदिरेला पाहुण्यांची चर्चा ऐकून कोणता खेळ सुचला?
३. 'आनंदभवन' हे 'स्वराज्यभवन' या नावाने का ओळखले जाऊ लागले?
४. बाहुलीविषयी इंदिरेला वाटणारे प्रेम कोणत्या वाक्यांतून जाणवते? ती बाहुली तिने का पेटवून दिली?
५. बालपणापासूनच इंदिराजींवर कोणकोणते संस्कार झाले?
६. इंदिराजींच्या स्वभावाचे कोणते विशेष या पाठात जाणवतात?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. आजही स्वदेशी वस्तूंचा आग्रह का धरायला हवा,यावर तुमच्या वादविवाद मंडळा-तर्फे चर्चा आयोजित करा.
२. भारताच्या स्वातंत्र्यासाठी कोणकोणती आंदोलने झाली, त्यांची माहिती मिळवा.

★ ★ ★



# २. लळा

**अनिल अवचट**

**अनिल त्र्यंबक अवचट** (जन्म : १९४४)एम.बी.बी.एस.ही वैद्यकीय पदवी मिळवूनही त्यांनी समाजकार्यास स्वतःला वाहून घेतले आहे. समाजाची दुःखे जाणून ती दूर करण्यासाठी झटण्याचे व्रत. 'वेध', 'माणसं', 'संभ्रम', 'वाघ्या-मुरळी', 'कोंडमारा' ही त्यांची पुस्तके. विविध मासिकांतून स्फुट लेखन.

ही कथा 'सत्यकथे'च्या दिवाळी अंकातून (१९८०) घेतली आहे. लेखकाने रस्त्यावरचे एक कुत्र्याचे पिलू घरी आणले. त्याच्या मुलीला त्या पिलाने किती लळा लावला याचे चित्रण या कथेत केले आहे.

---

**सकाळी** पायीपायी चक्कर मारायला गेलो होतो.झाडाखाली एक कुत्र्याचं पिलू केविलवाणा सूर काढत जमीन हुंगत फिरत होतं. एकदम मला बालपण आठवलं. लहानपणी मी असंच एक पिलू पाळायला घरी आणलं होतं; पण वडलांनी तो बेत हाणून पाडला होता. आता वाटलं, नेऊ या हे पिलू घरी. मुक्ताला खेळायला होईल. पोटाखाली हात घालून उचलून घेतलं. आधीची ओळख असल्यासारखं ते हातावर चिकटून बसून राहिलं. मनात आलं — किल्लीची, बॅटरीची महागडी खेळणी आणण्यापेक्षा हे जिवंत खेळणं कितीतरी चांगलं!

मुक्ता तर पिलावर फारच खूश होऊन गेली. तिनं खाटेखालच्या गाठोड्यातून तिच्या लहानपणची दुपटी काढली. एका कोपऱ्यात ती अंथरून पिलाला त्यावर झोपवलं. ते झोपेना. उठून बसून सगळीकडं पाहत बसू लागलं. मुक्ताला वाटायचं त्यानं बाळासारखं झोपावं; पण ते तर झोपत नव्हतं. मी तिला समजावलं, "अग, सकाळची वेळ आहे, कसं झोपेल ते?" तिला ते पटलं. मग जरा घरात चक्कर मारून आली.विचार केला आणि आईकडून वाटीत दूध घेऊन त्याच्यापुढं ठेवलं. पिलानं ते मात्र पटकन ऐकलं. मटमट



करत ते दूध संपवून टाकलं.

मुक्तानं आसपासच्या मैत्रिणी जमवल्या. नाव काय ठेवायचं, यावर बराच वेळ त्यांचं चाललं होतं. शेवटी 'राजू' हे नाव ठरलं. कारण कॉलनीत राजू नावाचा मोठा कुत्रा होता. तो काही महिन्यांपूर्वीच नाहीसा झाला होता.

दुपारी मी घरी परत आलो तोपर्यंत मुक्ताची पिलाबरोबर भलतीच दोस्ती झालेली होती. ती पिलाचे दोन्ही कान हातात पकडून लळतलोंबत इकडंतिकडं नेत होती. ते 'कुंई कुंई' आवाज करत होतं. पण त्याचीही फारशी तक्रार नसावी. त्याला खाली सोडलं तरी ते मुक्ता जाईल तिच्या मागोमाग लुटुलुटु पळत होतं. दुपारी मुली जमल्यावर आजचा खेळ राजूभोवतीच चालू होता. त्याला खाटेवरून खाली टाकायचं. खाली पडलं की ते बावरून इकडंतिकडं पळत सुटे.

नंतर राजूनं खोलीच्या मध्यावरही घाण केली. मी म्हटलं, ''काय ग हे, आता सारखी घाण करून ठेवणार अशीच.'' माझ्याकडं वळून मुक्ता म्हणाली,

"अरे बाबा, ते अजून लहान आहे." मी गप्प बसलो. तिनं अम्माला बोलावून आणून घाण काढून घेतली. राजूला ती बजावत होती, "शहाण्या मुलासारखं बाहेर जाऊन शी करायची, बरं का!"

रात्री उशिरा परत आलो. मुक्तानं स्वतःच्या गादीशेजारी त्याचं अंथरूण केलेलं दिसलं; पण ते पिलू मात्र तिच्या आणि मी झोपतो त्या जागेमध्ये जाऊन पहुडलं होतं. मला किळस वाटली. मी उचलून त्याच्या अंथरुणासह त्याला मागच्या अंगणात नेलं. बाहेर ठेवलं आणि दार लावून घेतलं.

गादीवर पडतोय तोच खुडबुड खुडबुड आवाज येऊ लागला. बंद दारापाशी येऊन पिलू आत यायचा प्रयत्न करत होतं. तसाच पडून राहिलो. झोपेत मधूनच जागा झालो. पिलू दाराशीच 'क्यांऊ क्यांऊ' असा आवाज करत बसलं होतं. त्याचं केकाटणं ऐकवेना. तसंच उठून तिकडं गेलो. माझी चाहूल लागताच त्यानं केकाटणं बंद केलं. कडी काढल्यावर, मी दार उघडायचीही वाट न पाहता दाराला फट पाडून ते आत आलं आणि परत मुक्ताशेजारी गादीत जाऊन पहुडलं.

दुसऱ्या दिवशी त्यानं घाण करण्याचा कहरच केला. तरी मुक्तासाठी अम्मा धावून शी काढत होती; पण ते कुठंही शी करून ठेवी. काय करावं ते कळेना. मुक्ता त्याला बाहेर नेऊन बसवायची. 'शी कर, शी कर', असं म्हणायची. पण ते ऐकत नव्हतं.

संध्याकाळी एक स्नेही घरी आले. मुक्ताला आनंद झाला. कारण ते वयानं मोठे असले तरी लहान मुलांत खूप खेळायचे. गोष्टीबिष्टी तर सांगायचेच; पण लपंडाव, शिवाशिवी असले खेळही खेळायचे. एवढे मोठे असूनही कॉटखाली जाऊन लपायचे. मुक्तानं त्यांना पिलू दाखवलं.

गप्पा मारताना मी त्या पिलाच्या घाणीचा त्रास सांगितला. ते म्हणाले, "त्यात काय? सोपं आहे. त्यानं घरात घाण केली, की तिथंच त्याला खूप फटकवायचं, म्हणजे त्याला बरोबर ते कळतं. मी आजपर्यंत बरीच कुत्री शिकवली आहेत. माझ्याकडं मागं एक कुत्रा होता. मी बाहेरनं आलो, की तो दारात उभा असायचा. हलायचा नाही. मी हात वर केला, की सुसाट पळत

यायचा. पायांत लाडानं घोटाळायचा. अंगावर उड्या मारायचा. परत हात वर केला, की निमूटपणं जाग्यावर जाऊन बसायचा. बाहेर निघाल्यावरही तसंच. काही अंतरावर तो बरोबर यायचा. 'जा', म्हटलं, की परत जाऊन बसायचा–हे सगळं शिक्षण मघाच्या नियमानंच केलं. जे नकोय त्याच्यासाठी चिक्कार फटकवायचं. हवं ते केलं की लाड करायचे.''

''त्याच्याशिवाय दुसरी काही पद्धत नाही का?''

''नाही बुवा! तुम्हांला कुत्र्याला शिकवायचं असेल, तर त्याला कडक शिस्तच लावायला हवी.''

एक तर, मी त्याला फटकावणं शक्य नव्हतं. दुसऱ्या कोणी फटकवायचं म्हटलं तरी मुक्ता थोडंच तसं करू देणार होती!

तिसऱ्या दिवशी ते वेगळाच गुण दाखवू लागलं. आतापर्यंत मुक्ता व इतर मुली लाडानं त्याचे हाल करायच्या, ते निमूटपणं सहन करायचं. आता ते गुरगुरू लागलं. त्याला मी इकडून तिकडं हाकलू लागलो, की ते अंगावरही येऊ लागलं. मुक्ता जरा कावरीबावरी झाली होती. तरी पण कुत्रं पाळण्याचा तिचा उत्साह कमी होत नव्हता. मुक्तापेक्षा लहान मुलगी यशोदा तेव्हा तान्ही होती. ती पहुडलेली असताना हे पिलू तिच्याशी मस्ती करू लागलं. एकदा तर तिच्या हाताला त्यानं ओचकारलं. नशीब, नुसता बारीक ओरखडा उठला होता. रक्त निघालं असतं तर इंजेक्शन द्यावं लागलं असतं.

आता मात्र ठरवलं, की बास झालं. हे कुत्रं सोडून द्यायचं.आमची अम्मा जवळच्या झोपडपट्टीत राहायची. तिला सांगितलं, ''येता जाता हे पिलू कुठंतरी सोडून ये.'' अर्थात हे सर्व मुक्ताच्या पश्चात. कुत्रं नेलं. तिच्या वस्तीच्याही पुढं बरंच अंतर जाऊन सोडून दिलं. आम्ही निःश्वास टाकला. पण अम्मा संध्याकाळी कामाला आली, तर तिच्या स्वागताला ते पिलू आधीच आमच्या दारात हजर!

मग अम्माच्या नवऱ्याला–अप्पाला– सांगितलं, ''तू सायकलवर जा आणि या पिलाला आणखी लांब कुठंतरी सोडून ये.''

एव्हाना त्या पिलाला आणि मुक्तालाही काय चाललंय याची कल्पना आली

होती. मुक्ताला आम्ही कसंबसं समजावलं. 'दुसऱ्या घरी पाळायला देऊ, मोठं झाल्यावर आणू', असं काहीतरी कारण सांगितलं. अप्पानं त्याला पिशवीत घातलं. घालताना पिलानं इतका त्रास दिला, की बस! पायच बाहेर ठेवायचा. संपूर्ण आत घातल्यावर उडी मारून परत बाहेर. कसंबसं कोंबून पिशवी सायकलला लावून अप्पा गेला. दोन-तीन किलोमीटर अंतरावर जाऊन सोडून आला.



दुसऱ्या दिवशी घरी येऊन मी कपडे काढतोय, तो घरातून येऊन पिलू माझ्यासमोर उभं! त्याचे डोळे फार बोलके होते. एकाच वेळी जिंकल्याचा भाव आणि करुण छटाही होती. मी त्याच्याकडं लक्षच दिलं नाही. परत परत पायांत येत होतं. मी पायानंच दूर करून पुढं जात होतो.

रात्री ठरवलं, आपण स्कूटरवरून याला लांब सोडू. मग कसं परत येईल? अप्पाला बेत सांगितला. मुक्ता झोपल्यावर आम्ही पिशवीत पिलू घातलं. कालच्या अनुभवावरून अप्पा पिलू पिशवीत कोंबण्यात तरबेज झाला होता. पिशवी पुढं पायांपाशी स्कूटरच्या हूकला लावली. मी स्कूटर सुरू करतो तोच ते पिलू पिशवीतून बाहेर पडून फुटबोर्डावर आलं होतं. पण स्कूटर एव्हाना वेगात सुरू झाली होती. ते दबकून तसंच उभं होतं.

सहा-सात किलोमीटर स्कूटर दामटली. कुठं सोडायचं त्याचा विचार आधीच करून ठेवला होता. त्याला मोकळ्यावर सोडण्यापेक्षा एखाद्या झोपडपट्टीनजीक सोडावं, म्हणजे त्याला कुठंतरी आसरा मिळेल. निदान उकिरड्यातलं तरी खाऊन जगेल. झोपडपट्टी घरापासून पुरेशी लांबही होती. रात्री दहाचा सुमार होता. झोपडपट्टीच्या जरा पुढं गेलो. रस्त्यावरच्या दिव्यापाशी स्कूटर हळू करून थांबवली. मनाचा निर्धार करून मी फुटबोर्डवरचं पिलू उचललं, रस्त्यावर ठेवलं आणि गर्रकन स्कूटर वळवली व परतू लागलो. काही अंतर ते जीव खाऊन आमचा पाठलाग करत होतं; पण स्कूटर वेगानं सोडली तसं ते मागं पडलं आणि आम्ही घरी आलो. सकाळपर्यंत ते परत आलं नाही.

सकाळी बाहेर पडताना त्याच रस्त्यानं जायचं होतं. कुतूहल म्हणून पिलू दिसतंय का पाहू या, म्हणून विचार करत होतो. झोपडपट्टीच्या अलीकडं रस्त्यावर ते दिसलं. डोक्यावरच्या ठिपक्यावरून मी त्याला ओळखलं. त्याचा जबडा हसल्यासारखा जमिनीवर पसरला होता. पोटातल्या आतड्यांची दोरी लांबवर गेली होती. झोपडपट्टीच्या अलीकडं म्हणजे आमच्या घराकडं ते येत असताना त्याला अपघात झाला असावा.

आता ते पिलू कधीच घरी येणार नाही, याची चुटपूट माझ्या मनाला लागली.

सकाळी मुक्ता शाळेत जात असल्यामुळं रात्रीनंतर दुपारीच ती भेटली. म्हणाली, ''बाबा, राजूला सोडून आलात ना?''

''हो.''

"त्याला सांभाळायला दिलंत ना?"

"हो."

जरा वेळ ती इकडंतिकडं करत होती. संध्याकाळी परत बाहेर जायला निघालो. मुक्तानं गडबडीनं एक छोटं गाठोडं आणून दिलं. म्हणाली,"यात त्याची दुपटी आहेत. ती त्याला नेऊन द्या." परत आत जाऊन चुरगळलेल्या कागदाची एक पुडी आणून दिली व म्हणाली, "यात फुटाणे आहेत."

मी मान हालवली आणि स्कूटर सुरू केली.

दोन-चार दिवसांत ती राजूला विसरली; पण मी मात्र त्याला विसरू शकलो नाही.

जे घडलं त्यामुळं आता कितीही गोजिरवाणं पिलू दिसलं तर उचलून घेणं राहोच; पण त्याला साधा हात लावायचं धाडस मला होत नाही.

**शब्दार्थ व टिपा :**

**दुपटे**—लहान मुलाला लपेटण्याचे वस्त्र. **फटकावणे**—फटका मारणे. **फुटबोर्ड**—स्कूटरवरील पाय ठेवण्याची जागा.

**गुण दाखवणे**—खरा स्वभाव दाखवणे; खरे स्वरूप प्रकट करणे.

**प्रश्न :**

१. पिलू घरी आणल्यावर मुक्ताने काय केले?
२. स्नेह्यांनी कोणता सल्ला दिला?
३. लेखकाने पिलाला सोडून द्यायचे का ठरवले?
४. पिलू कुठे आहे, असे मुक्ताला वाटले?
५. पिलासाठी मुक्ताने काय काय दिले? का?
६. कोणत्याही गोजिरवाण्या पिलाला हात लावण्याचं धाडस होत नाही, असे लेखकाला का वाटते?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. एखादया प्राण्याविषयीचे तुमचे अनुभव दहा-बारा ओळींत लिहा.

★ ★ ★



# ३. हातांची किमया

**ना. ग. गोरे**

**नारायण गणेश गोरे** (जन्म : १९०७; मृत्यू : १९९३) भारतीय स्वातंत्र्यलढ्यातील स्वातंत्र्य-सैनिक. लोकसभेचे व राज्यसभेचे माजी सदस्य. ब्रिटनमध्ये परराष्ट्रीय वकील होते. उत्तम वक्ते. 'कारागृहाच्या भिंती', 'शंख आणि शिंपले', 'सीतेचे पोहे' इत्यादी त्यांची पुस्तके. 'बेडूकवाडी', 'चिमुताई घर बांधतात' ही मुलांसाठी लिहिलेली पुस्तके. पंडित नेहरूंच्या आत्मचरित्राचा मराठीत अनुवाद.

'करवंदे' या त्यांच्या पुस्तकातून हा उतारा घेतला आहे. सामुदायिक श्रमाचे महत्त्व किती आहे ते या उताऱ्यात सांगितले आहे.

---

**कोल्हापूरहून** आम्ही निघालो तो तडक मूरलाच आलो. मूरला आमच्या गाड्या ठेचाळत-हेंदकळत पोचल्या. तो मध्यरात्र उलटून गेली होती. ढगाआडून पाझरलेल्या चंद्रम्याच्या प्रकाशानं काळोख उजळून भुरा झालेला होता. डोंगर नि सडे, टेकड्या नि टेंबं वाकळी पांघरून शांत झोपी गेल्यासारखी दिसत होती. मधूनच एखाद्या ऐनाच्या उंच गेलेल्या झाडात शेकडो काजवे चमकत अथवा एखादं वाघूळ किंवा घुबड त्या भुऱ्या अंधाराच्या दर्यातून आपली पंखांची वल्ही मारत सपकन निघून जात असे. एक भली मोठी चक्कर घेऊन आमच्या गाड्या शिबिरात येऊन दाखल झाल्या.

आम्ही उठलो, तो चांगलं फटफटलं होतं. आता पूर्वेला थेट सह्याद्रीच्या धारेपर्यंतचा प्रदेश, मूरपासून तेथपर्यंत चढत गेलेल्या डोंगरांच्या ओळी, पाचलवरून मूरकडं येणारा रस्ता, सगळं काही साफ दिसू लागलं होतं. मी तोंड धुऊन येतो, तो शिंबिराच्या अंगणातला झेंडा स्तंभावर फडफडू लागला होता आणि स्त्रीपुरुष-सैनिक कुदळी, फावडी व घमेली घेऊन गाणी म्हणत कामावर निघाले होते.

मूर गावाच्या बाहेर राईमध्ये शंकराचं देऊळ एका टेंबावर बांधलेलं आहे. त्याच्या पायथ्यापाशीच ओढ्याचा आसरा पाहून छावणी उभारण्यात आलेली आहे. मेढी उभारून त्यांवर आडवे बांबू बांधले, त्यांच्यावर झाडाचे हिरवेगार टहाळ पसरले आणि सभोवार टहाळांचाच कूड केला, की झाली छावणी तयार.

मूर हे गाव चोहीकडून लहानमोठ्या डोंगरांनी घेरलेलं आहे. डोंगराच्या द्रोणात ठेवल्यासारखं दिसतं ते. मूर आणि त्याच्या आसपासच्या आठ-दहा गावांना जवळचं शहर म्हणजे राजापूर. घाटावरची मलकापुरासारखी गावं जवळच आहेत; पण तिथं पोचायचं म्हणजे अवघड उभेसूळ घाट चढावे लागतात. ते घाट फोडून सोपे करावयाचे म्हणजे फार खर्चाचं व बिकट काम असल्यामुळं या तळवटातल्या गावांना राजापुराशीच हमेशा व्यवहार करावा लागतो. कौला-चिऱ्यासारख्या अवजड वस्तूंपासून हळद, मीठ, मिरचीसारख्या हरगरजेच्या वाणजिनसांपर्यंत सगळ्या मालाची वाहतूक पाचलवरून येणाऱ्या रस्त्यानं करावी लागते. पण राजापूर ते पाचल रस्ता तर असा आहे, की प्रवाशाची निम्मी हाडं एका फेरीत मोकळी व्हावीत. पाचलपासून मूरपर्यंतचा पुढचा रस्ता तर विचारूच नका. मूर गावाच्या वर थोड्या अंतरावर जी खिंड आहे, तिच्यातून बैलगाड्या सुखरूप आणणाऱ्या गाडीवानांची तारीफ करावी, की बैलांची, ते समजत नाही. खिंडीपर्यंत गाडी ओढताना बैल उरी तरी फुटतात, नाही तर पायांत मोडतात. अशा या रस्त्यात आलेल्या धोंडी, झाडांचे ठोंब खणून काढून तो साफ करणं, या रस्त्याचा ढाळ जरा हलका करणं, डोंगर तोडून रस्ता जरा रुंद करून घेणं अत्यंत जरूर होतं.

रत्नागिरीच्या कार्यकर्त्यांनी ठरवलं, की त्या रस्त्याची दुरुस्ती आपण हाती घ्यायची. भारतासारख्या सात लाख खेड्यांच्या आपल्या या देशात रस्ते म्हणजे रक्तवाहिन्या होत. मनुष्याच्या रक्तवाहिन्या वाहत्या राहिल्या तरच रक्ताचे अभिसरण होणार, ताज्या रक्ताचा पुरवठा नि शिळ्या रक्ताचं शुद्धीकरण होऊन देहातील पेशी अन् पेशी कार्यक्षम राहणार. त्याचप्रमाणं देशातले लहानमोठे रस्ते व्यवस्थित वाहत राहिले तरच दळणवळण व व्यापार-उदीम

चालणार, नवे ज्ञान व नवी साधनं फैलावणार. पण रस्ते बांधणं फार खर्चाचं काम असतं. मैलभर रस्ता करायचा तर हजारो रुपये खर्च येतो आणि आपला देश तर पडला गरीब. कुठून आणायचे हजारो-लाखो रुपये? पण आपल्यापाशी द्रव्यबळ नसलं तरी दुसरं एक बळ आपल्यापाशी आहे ना! ते म्हणजे मनुष्यबळ. भारतातील कोट्यवधी लोकसंख्येपैकी पन्नास वर्षांपर्यंतच्या वयाच्या माणसांनी देशासाठी, समाजासाठी रोज फक्त तास-अर्धातास जरी काम केलं, तरी केवढी कामं पार पडतील याची कल्पना करा.

आपल्या देशातील हे मनुष्यबळ मात्र आज आंधळं होऊन बसलं आहे. रुसून बसलं आहे. कडेला पडून गंजून जात आहे. हिंदळ्यात काळभैरवाच्या देवळापर्यंत जी चिरेबंदी वाट बांधलेली आहे, ती गावकऱ्यांनीच बांधलेली. हेच कशाला, जवळजवळ प्रत्येक गावात पूर्वी बांधलेली देवळं, तळी, रस्ते, घाट दिसून येतात, ती सगळी कामं गावकऱ्यांनी आपल्या सामुदायिक श्रमांनी पार पाडलेली आहेत. पारतंत्र्याच्या काळात सामुदायिक श्रमांचा हा कल्पवृक्ष वठून, झडून गेला होता; तो आता पुन्हा फळत आहे.

सात-साडेसातच्या सुमाराला मी मूरच्या खिंडीत गेलो. खिंडीशी पोचेपर्यंत-च्या एक-दीड किलोमीटरच्या घाटीवर गेल्या पंधरा दिवसांत पंचक्रोशीतील गावकऱ्यांनी जे काम केलं होतं, त्याची साक्ष जागोजाग आढळत होतीच. डोंगराकडची बाजू दोन-तीन हात खापून काढून तो सर्व रस्ता रुंद केला होता. डोंगराच्या उतरणीवर चर काढून पावसाचं पाणी परभारे वरच्यावर काढून लावण्याची व्यवस्था केली होती. जिथं वळण फार मुरडीचं होतं, तिथं तर रस्ता इतका ऐसपैस केलेला होता, की दोन बैलगाड्या सुखानं जाव्या. कवेत न मावतील असे धोंडे निखळून काढून खालच्या दरडीत कोसळून घातले होते. काम जवळजवळ संपत आलं होतं. माथ्यावर ऐन खिंडीत पडलेल्या चाकोऱ्या नि खड्डे भरून काढून दोन्ही बाजूंनी चर तयार करण्याचं काम तेवढं उरलं होतं. आज शेवटचा दिवस. आज संध्याकाळपर्यंत एवढं काम पुरं करायचंच असा सैनिकांनी निश्चय केला होता.

मुलगे, मुली, शेतकरी आणि बायाबापड्या ही झाडून सारी कामाला लागली

होती. मुले मुरूम खणत होती आणि मुली घमेली भरभरून तो मुरूम, धोंडे पसरून तयार केलेल्या माचावर पसरत होत्या. काहीजण कुदळी घेऊन दोन्ही कडांचे चर बनवत होते. वाव-वाव लांबीच्या पहारी फार जड होत्या; पण काही ठिकाणचा फत्तर असा चिवट होता, की ह्या अवजड पहारींची टोकंही तो वळवून टाकत होता. पण दगड एकदम घाव घेत नसला म्हणून काय झालं? खण् खण् खण् असे घाव चालूच होते. दगड दाद देत नव्हता. एखादी कळपा-कपची उडत होती; पण घावांना खंड नव्हता. शेवटी एका घावाला पहारीखाली खणखणणारा फत्तर बद्द वाजला आणि दुसऱ्या घावाला त्याची छकलं पडली. रस्त्यातलं एक टेंगूळ साफ झालं.



असं हे काम चाललं होतं. अंगूळ-अंगूळ कामाचं हातभर काम होतं आणि हात-हात काम करता करता एक गाव दुसऱ्या गावाशी जोडला जात होता. सामुदायिक श्रमांमुळं केवळ नवे रस्ते, नवी तळीच तयार होत नव्हती, तर नवी मनं तयार होत होती. कारण संध्याकाळी काम संपलं, की आजूबाजूच्या खेड्यांत कार्यकर्ते जात. गावकऱ्यांना जमवत. त्यांना गाणी म्हणून दाखवत. जगातील घडामोडी त्यांना समजावून सांगत. मुली गावातील बायकांना भेटत. त्यांच्याशी बोलत. त्यांना कामाला घेऊन येत. सुशिक्षित जीवनाचा धागा श्रमिक जीवनाशी जोडून घेण्याचा हा प्रयत्न होता.

संध्याकाळी शिबिरामध्ये समारोपाचा समारंभ झाला. अहवाल वाचण्यांत आला. त्यात किती काम झालं त्याची माहिती दिली, तेव्हा समारंभासाठी आलेल्या गावकऱ्यांना आश्चर्य वाटलं. आपण पंधरा दिवसांत एवढं काम केलं याची त्यांना कल्पना नव्हती. ती हकीकत ऐकून त्यांच्यात खूप उत्साह संचरला. त्यांनी समारंभ संपल्यावर जिल्हाधिकाऱ्यांकडे एक अर्ज सादर केला. त्यात अशी मागणी केली — पावसाळा उलटल्यावर काजिर्ड्याचा घाट फोडण्याचा आम्हा गावकऱ्यांचा मनसुबा आहे; तरी त्यासाठी सरकारकडून परवानगी मिळावी. गावकरी म्हणाले, की त्या कामासाठी पाचशेपासून हजारापर्यंत गडी-माणूस लागलं तरी ते आम्ही उभं करू.

आमची राजापुरास परतण्याची वेळ झाली. गाड्या जुंपून तयार होत्या; पण मी पायीपायीच घाटी चढून गेलो. खिंडीशी पोचल्यावर मी क्षणभर मागं वळून पाहिलं. उजव्या बाजूला एका किलोमीटरवर शिबिराच्या अंगणातला पेट्रोमॅक्स झगझगत होता आणि सेवापथकातील सैनिकांचा किलबिलाट कानावर येत होता. चंद्रबिंब घाटमाथा सोडून हातभर वर सरकलं होतं आणि डोंगराच्या द्रोणातलं ते मूर गाव पुन्हा त्या भुऱ्या काळोखात पेंगू लागलं होतं. माझी पावलं चढणीवर पडत असताना पायाखाली नव्यानं पसरलेला मुरूम मऊ लागत होता आणि पाचलकडून येणाऱ्या गाड्यांची चाकं वरंगळीस लागल्यावर आता न ठेचाळता, न आपटता त्या मुरमातून घुरुघुरु करत मूरची घाटी उतरत होती.

मी पाचलच्या वाटेला लागलो तेव्हा सगळीकडं पसरलेल्या मंद चांदण्यासारखाच आनंद माझ्याही मनात भरून राहिला होता.



## शब्दार्थ व टिपा :

**सडा** —डोंगराच्या माथ्यावरील सपाट जमीन. **टेंबा** —डोंगराचा सुळका, शिखर. **मेढ** —रोवलेला खांब, बांबू. **टहाळा** —हिरव्या पानांची डहाळी. **उभेसूळ** —सरळ उभे. **वाणजिन्नस** —किराणा माल. **खापणे** —कापणे. **वाव** —दोन्ही हात पूर्ण पसरल्यावर होणारी लांबी. **मनसुबा** —विचार; बेत.

## प्रश्न :

१. शिबिर कशासाठी भरवले होते?
२. मूरच्या निसर्गरम्य परिसराची वैशिष्ट्ये सांगा.
३. 'देशाचे रस्ते म्हणजे रक्तवाहिन्या होत', असे का म्हटले आहे?
४. पारतंत्र्याच्या काळात कोणता कल्पवृक्ष वठला होता?
५. आता या वृक्षामध्ये कोणता बदल झाला आहे?
६. या शिबिरापासून गावकऱ्यांनी स्फूर्ती घेतली, हे कोणत्या गोष्टीवरून दिसून येते?
७. 'हातांची किमया' हे नाव या पाठाला का दिले आहे?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. 'अंधार दर्या', 'पंखांची वल्ही' या कल्पना समजून घ्या.
२. 'टेकड्या नि टेंबं वाकळी पांघरून शांत झोपी गेल्यासारखी दिसत होती.' यासारखी या पाठातील इतर सुंदर वाक्ये शोधा व ती वहीत लिहा.
३. एखादया गावास पाण्याची नेहमीच उणीव भासते. अशा वेळी गावकऱ्यांनी गावाजवळ तळे खोदण्याची एक योजना कशी आखून पार पाडली, याचे वर्णन दहा-बारा ओळींत करा.

★ ★ ★



# ४. सुंदरबनातील वाघांची सभा

दादा धर्माधिकारी

**शंकर त्र्यंबक धर्माधिकारी** (जन्म : १८९९; मृत्यू : १९८५) मराठी, हिंदी आणि इंग्रजी भाषांतील पट्टीचे वक्ते आणि लेखक. सर्वोदयी कार्यकर्ते. विनोबा, जयप्रकाश नारायण यांचे सहकारी. 'दादांच्या बोधकथा', 'स्नेहाचे झरे', 'सर्वोदय-दर्शन', 'तरुणाई' ही त्यांची पुस्तके. भाषणांचे व पत्रांचेही संग्रह प्रकाशित.

दादा आपल्या व्याख्यानांत अनेक लोककथांचा चपखलपणे वापर करत. 'सुंदरबनातील वाघांची सभा' ही अशीच त्यांनी सांगितलेली एक मार्मिक लोककथा.

---

**सुंदरबन** हे नावाप्रमाणंच फार सुंदर होतं. झाडंपेडं भरगच्च होती. नाना तऱ्हेचे पक्षी तिथं राहत होते. पशूंनाही सुंदरबन खूप आवडत असे. सगळे आनंदानं राहत. कोणला कशाची ददात म्हणून नसे.

सुंदरबनात वाघही पुष्कळ होते. पिवळाधमक रंग. त्यावर काळे मखमली पट्टे. स्वच्छ अंघोळ केल्यासारखे ते वाघ ताजेतवाने दिसत.

एकदा सुंदरबनातील एका वाघाला एका सर्कसवाल्यानं पकडून नेलं. सारे वाघ दुःखीकष्टी झाले. पण त्यांना वाटायचं, की वाघ हा हरहुन्नरी प्राणी आहे. सर्कसवाल्यांच्या पिंजऱ्यातनं आपला मित्र कधीना कधी सुटका करून घेईल आणि नक्कीच परत आपल्याला येऊन मिळेल.

ते त्याची रोज वाट पाहत. तो आला नाही तर हताश होत; पण दुसऱ्या दिवशी पुन्हा वाट पाहत.

होता करता दिवसमास निघून गेले. सुंदरबनातील वाघ आपल्या सोबत्याची वाट पाहून शिणून गेले.

इतक्यात एक दिवस पहाटेच त्यांना एक डरकाळी ऐकू आली. आपला मित्र आला असावा असं वाटून त्यांनीही प्रतिडरकाळ्या फोडल्या. सारं सुंदरबन दणाणून गेलं.

जिकडून डरकाळी आली होती त्या दिशेकडं सगळे वाघ निघाले.

वाटेतच त्याची भेट झाली. साऱ्या वाघांनी त्याची पाळीपाळीनं गळाभेट घेतली. आनंद व्यक्त केला. आनंदानं बेहोष होऊन ते नाचले.

एक प्रौढ वाघ त्यांना म्हणाला, "सुंदरबनातील वाघमित्रांनो, आपल्या सर्वांना असा विलक्षण आनंद होणं स्वाभाविक आहे. सर्कसवाल्यांच्या पिंजऱ्यातून आपला मित्र सहीसलामत परत आला, ही भाग्याची गोष्ट आहे. परंतु इतक्या लांबून आपला मित्र आला त्यामुळं थकला-भागला असेल, तेव्हा आपण आता असं करू — आपल्या घेरावातून त्याला मोकळा करू आणि उद्या रात्री त्याचा सत्कारसोहळा साजरा करू. त्याचे अनुभव ऐकू. त्याच्या अनुभवाचे बोल आपल्याला उपयोगी पडतील."

सर्व वाघ पांगले. सर्कसमधून सुटका करून परत आलेला वाघ विश्रांतीसाठी एकटाच निघून गेला.

ठरल्याप्रमाणं दुसऱ्या रात्री वाघांची सभा भरली. प्रत्येक वाघ भाषण करताना त्याचा मोठा गौरव करी. सर्वांत मोठा वाघ अध्यक्षस्थानी होता. तो म्हणाला, "ह्या आपल्या मित्रानं मोठी बहादुरी केलीय! त्याला आज आपण एक पदवी देऊ या. त्याला 'बृहल्लांगुलाचार्य' म्हणू या. असे बुचकळ्यात पडू नका. बृहल्लांगुलाचार्य म्हणजे लांब शेपटी असणारा. शेपटी हे वाघाचे वैभव आहे. शिकारी वाघाची लांबी मोजताना शेपटीच्या टोकापासून त्याच्या मिशीपर्यंत माप घेतलं जातं. त्यावरून शेपटीचं महत्त्व आपल्या ध्यानात येईलच. बोला — बृहल्लांगुलाचार्य की जय!"

सर्वांनी जयजयकार केला.

एक जवान वाघ पुढं सरसावून म्हणाला, "परदेशात जाऊन आलेल्या माणसाला त्याचे भाऊबंद 'फॉरिन रिटर्न्ड' असं आदरानं म्हणतात. आपण आपल्या ह्या शूर शिलेदाराला 'मॅनलँड रिटर्न्ड' असं म्हणणं योग्य होईल. इंग्लिश शब्दानं असं बिचकू नका. 'मॅनलँड रिटर्न्ड' याचा अर्थ मानवभूमीला भेट देऊन परत आलेला, एवढाच होतो."

समस्त वाघांनी टाळ्या वाजवून त्या जवान वाघाला साथ दिली.

बृहल्लांगुलाचार्य' अभिमानानं छाती फुगवून उभा राहिला. सर्कसमध्ये काही काळ घालवल्यामुळं त्याला मागच्या दोन पायांवर उभं राहण्याची चांगलीच सवय झाली होती.

तो म्हणाला, "मित्रहो, तुम्ही माझा जो आपलेपणानं गौरव केला, त्याबद्दल मी तुमचा फार आभारी आहे. सुंदरबनात परत आल्यामुळं मी इतका सुखावलो आहे, की विचारता सोय नाही! माझ्या आनंदाला पारावार उरला नाही."

सर्व वाघांनी बृहल्लांगुलाचार्यांचा पुन्हा एकदा जयजयकार केला!



त्या सर्वांना मान लववून अभिवादन करत तो म्हणाला, "मित्रांनो, मनुष्यलोकातील माझे अनुभव ऐकण्याला तुम्ही उत्सुक आहात. मित्रांनो, सर्कशीत काम करण्याच्या निमित्तानं माझा माणसांशी खूप संबंध आला. मी त्या अनुभवांवरून सांगतो, की माणूस फार शहाणा आहे, हा आपला एक अपसमज आहे."

सगळे वाघ कान टवकारून ऐकू लागले.

बृहल्लांगुलाचार्य म्हणाला, "एक उदाहरण दिलं तरी त्यावरून तुमची खात्री पटेल. माणसांच्या बाबतीत एक गोष्ट मी पुन्हा पुन्हा ऐकली ती ही, की अमुक पैसे खातो, तमुक पैसे खातो. कितीतरी वेळा मी हा शब्द ऐकला. माणसासारखा शहाणा प्राणी पैसे खातो, त्या अर्थी पैसा हा फार स्वादिष्ट पदार्थ असावा अशी माझी समजूत झाली. पैसे खाण्याची संधी कधी मिळते त्याची मी वाट पाहू लागलो. सुदैवानं तशी संधी एकदा मला मिळाली.

"मित्रांनो, एक दिवस माझ्या पिंजऱ्याजवळच पैशाचं पाकीट पडलेलं मला दिसलं. मी ते उचललं. उघडलं तर आत एक सुंदर गोल चकचकीत वस्तू मी पाहिली, वाटलं — पैसा पैसा म्हणतात ती हीच वस्तू असावी."



पुढं तो म्हणाला, "मग ती वस्तू मी जिभेवर ठेवली. पण कसचं काय अन् कसचं काय! काहीच चव नाही. ना गोड, ना तिखट, ना तुरट, ना आंबट. थोडा वेळ चघळूनही पाहिलं;पण तरीही काही नाही. मग वाटलं,चावून खाण्याची ही वस्तू असावी; पण ती चावता चावली जाईना. दात पडायची वेळ आली; पण काही नाही. ना चव ना ढव. मग विचार केला, की ती वस्तू पौष्टिक गोळी असावी आणि म्हणून ती गिळून टाकली. मित्रांनो, काय सांगू! ती वस्तू पोटात गेली आणि तेव्हापासून जे पोटात दुखू लागलंय ते आतापर्यंत."



एकदम पोटात कळ यावी तसा त्यानं चेहरा वाकडा केला. पुढच्या एका पायानं पोट दाबलं. सर्व वाघ व्याकूळ नजरेनं त्याच्याकडं पाहू लागले, तेव्हा बृहल्लांगुलाचार्य म्हणाला, "मित्रांनो, मधेच ही अशी असह्य कळ येते. वाघासारख्या जबरदस्त पचनशक्ती असलेल्या प्राण्याची ही दशा, मग माणसाची काय अवस्था होत असेल देव जाणे! मित्रांनो, यावरून तुमच्या ध्यानी येईल, की माणूस हा वाटतो तितका शहाणा प्राणी नाही. काय खावं, काय नाही, हेसुद्धा त्याला कळत नाही! तेव्हा मित्रांनो, माझी अशी विनंती आहे, की माणसाची आपण कीव करावी आणि त्याच्या सांस्कृतिक व वैचारिक विकासासाठी आपण काहीतरी योजना आखावी. अज्ञानी असणं ही चूक नव्हे;

पण अज्ञानी असून शहाणपणाचा टेंभा मिरवणं, ही मात्र फार मोठी चूक आहे. माणूस कसाही वागत असला, तरी अखेरीस तोही एक प्राणीच आहे आणि प्राणिमात्रांवर दया करणं हा मोठा गुण आहे. आपण सर्व वाघमित्रांनी तो दाखवावा अशी माझी आपणाला नम्र विनंती आहे.''

बृहल्लांगुलाचार्यांचं ते कळकळीचं भाषण ऐकून समस्त वाघांना आनंद झाला. त्यांनी टाळ्या वाजवून तो प्रकट केला. सुंदरबन टाळ्यांच्या कडकडाटानं आणि बृहल्लांगुलाचार्यांच्या जयजयकारानं दणाणून गेलं.

## शब्दार्थ व टिपा :

**ददात** — तुटवडा. **हरहुन्नरी** — विविध कला अंगी असणारा. **शिणून जाणे** — थकून जाणे. **फॉरिन रिटर्न्ड** — परदेशाचा प्रवास करून आलेला. **अभिवादन** — वंदन; नमस्कार. **अपसमज** — चुकीची समजूत. **स्वादिष्ट** — चवदार.

## प्रश्न :

१. सुंदरबनातील वाघ कष्टी का झाले?
२. सर्कसवाल्याच्या पिंजऱ्यातून सुटून आलेल्या वाघाचे स्वागत त्याच्या मित्रांनी कसे केले, ते तुमच्या शब्दांत सांगा.
३. पैसा खाल्ल्यावर वाघाला कोणता अनुभव आला?
४. 'माणूस फार शहाणा आहे असा आपला अपसमज आहे', असे वाघाने का म्हटले?
५. या लोककथेचा कोणता हेतू आहे असे तुम्हांला वाटते?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. 'पैसा पैसा म्हणतात ती हीच वस्तू असावी', या वाक्याप्रमाणे खालील शब्द योजून वाक्ये तयार करा :

   समुद्र, विमान, गरूड.
२. या लोककथेसारख्या आणखी काही लोककथा मिळवा आणि त्या आपल्या वर्गात सांगा.

★ ★ ★



# ५. पक्षी पिंजऱ्यातून उडाला

लीलाताई पाटील

**लीलाताई उत्तमराव पाटील** (जन्म : १९२२; मृत्यू : १९८५) भारतीय स्वातंत्र्य-लढ्याच्या १९४२ ते ४५ पर्यंतच्या क्रांतिकारक पर्वात तुरुंगवास. भूमिगत कार्यकर्त्या. समाजसेवेत सतत मग्न. बेचाळीसच्या रोमहर्षक लढ्यातील अनुभव कथन करणारे काही लेख.

हा पाठ 'दोंडाईचे लोकमानस' या साप्ताहिकाच्या १५ ऑगस्ट, १९८५ च्या विशेषांकातून घेतला आहे. १९४२ साली 'छोडो भारत' आंदोलन पेटले. या आंदोलनात प्रत्यक्ष भाग घेतलेल्या देशसेविकेचे जिवंत अनुभव या पाठात वाचा.

---

**'चले जाव'ची** घोषणा गांधीजींनी केली. पंडित नेहरू आदी पुढाऱ्यांना अहमदनगरच्या तुरुंगात ठेवलं. देश स्वतंत्र व्हावा म्हणून आंदोलन उभं राहिलं. सर्व देश पेटला.

सानेगुरुजींचं अमळनेरही पेटलं. पोस्ट ऑफिस जाळलं. कोर्टाची अक्षरशः राख झाली. पेटलेल्या स्टेशनच्या ज्वालेनं अमळनेर शहर उजळलं व स्टेशनचं स्मशान झालं.

कचेरी ताब्यात घेण्यासाठी मोर्चा कचेरीवर चालून गेला. आधीच दबा धरून बसलेल्या पोलिसांनी अंधाराचा फायदा घेऊन स्वैर गोळीबार केला. दोन बळी पडले. अनेक जखमी झाले. कचेरी ताब्यात घेऊन तिरंगा फडकवण्याचं आमचं स्वप्नं भंगलं.

घण घण घंटानाद करत, लष्कराच्या शिरस्त्राणधारी गोऱ्या सोजिरांनी भरलेल्या चिलखती गाड्या रस्त्यांतून गोळ्या झाडत धावू लागल्या.

'नहीं रखनी – नहीं रखनी,'

जालिम सरकार – नहीं रखनी'

या गाण्याला साथ देत आमची छोटी मिरवणूक निघाली. मार्शल लॉच्या पंजाब मेलला धडक द्यायला अश्राप गाई गल्ली-बोळांतून निघून पोलिसांना चकवत अमळनेरच्या लालबागेपाशी थडकल्या. आता आम्ही–मी व नाना–दोघंच राहिलो. पोलिसांची गाडी धावत आली. पोलिसांनी गाडीतून उड्या मारून आम्हांला अडवलं. न जुमानणाऱ्या दशरथनानांना त्यांनी झडप घालून पकडलं. झोंबाझोंबी सुरू झाली. दस्त्यानं नानांना झोडपून आडवं पाडलं, तुडवलं व गाडीत कोंबलं. नाना त्या मोटारीतून घोषणा देत होते —

'ऑगस्ट क्रांती झिंदाबाद!'

'इंग्रज राज्य मुर्दाबाद!'

या संधीचा फायदा घेऊन 'झंडा ऊँचा रहे हमारा' असं गात मी पुढं सटकले. लगेच काही पोलीस धावले, मला त्यांनी घेरलं. हिसका देऊन मी त्यातूनही पुन्हा वाट काढली.

बाईला कसं अडवायचं, या संभ्रमात ते पडले. तोच पोलीस अधिकाऱ्यानं हुकूम सोडला, "क्या देखते हो? खेचो झंडा, लगाव दस्ते।"

पोलिसांनी माझ्या हातांतून झेंडा काढण्यासाठी झोंबाझोंबी सुरू केली. दोन्ही मुठींत झेंडा घट्ट धरून आणि काठी दोन्ही पायांत पकडून झेंडा छाती-पोटाशी घट्ट धरण्यासाठी जरा वाकले, तोच मागून एका पाठोपाठ एक असे अनेक दंड्यांचे व दस्त्यांचे तडाखे पाठीवर, कंबरेवर बसले. मी खाली कोलमडले. पडता पडता झेंडा अंगाखाली दाबून जमिनीला घट्ट आवळलं. पोलिसांनी मला मोटारीत घातलं. काठी हातातून गेली; पण माझ्या मुठीतला झेंडा माझ्याबरोबर मोटारीत आला. मी ओरडले —

'झंडा ऊँचा रहे हमारा!' लगेच नानानंही साथ दिली — 'ऑगस्ट क्रांती झिंदाबाद!'

मला व नानाला एक वर्षाची शिक्षा सुनवून लगेच धुळ्याच्या जेलमध्ये डांबलं. धुळ्याच्या औरतकोठ्यात–माझ्या जुन्या ओळखीच्या कोठीतच मला कोंडलं.

अमळनेरच्या जळिताचा दुसरा खटला माझ्यावर पुन्हा भरला. जळगावच्या

तुरुंगात चार महिने राहिले. निकालाचा दिवस उजाडला. मला साडेसहा वर्षांची सश्रम कारावासाची शिक्षा देण्यात आली. एवढ्या शिक्षेचं सोनेरी पदक पटकावणारी हिंदुस्थानातील मी पहिलीच स्त्री असावी, या विचारानं माझी मान उंच झाली. मला धन्य वाटलं.

माझा लहानगा दहा वर्षांचा भाऊ भास्कर मला बिलगून म्हणाला, "ताई, मीही तुझ्याबरोबर येतो. तुला फार शिक्षा झाली ग! अर्धी अर्धी वाटून घेऊ." माझं मन भरून आलं. मला फार फार बरं वाटलं. मी त्याला जवळ ओढून म्हणाले, "बरं, बरं, तू आता घरी जा. मायला सांग– रडू नको. म्हणावं,ताई आनंदात आहे. आता ये माझ्या राजा!"

एका अंधाऱ्या रात्री मला कोठडीतून बाहेर काढलं. 'कुठं, काय–' हा प्रश्न विचारण्याचा कैद्यालाअधिकार कुठं असतो? मागं पोलीस, पुढं पोलीस, मध्ये मी. सभोवार अंधार, धुळ्याच्या तुरुंगातून काढून मला ठाण्याच्या तुरुंगात आणलं. तुरुंग कसला, नरकवासच तो! तिथं गेल्याबरोबर माझा छळ सुरू झाला. तिथं ठाण्याच्या, नाशिकच्या, मुंबईच्या अनेक राजकीय स्त्री कैद्यांची सोबत मला मिळाली. दुःखात सुख एवढंच. दोन-चार महिन्यांनी साऱ्या सुटल्या आणि मी एकटीच राहिले. प्रथम मला गुन्हेगार कैद्यांत कोंडलं. मी त्याचा प्रतिकार केला. मला स्वतंत्र कोठडी मिळाली; पण माझा छळ अधिकच सुरू झाला. मीही हट्टाला पेटले. एकेक कायदा मोडावा, एकेक शिक्षा घ्यावी. कांजी-रोटीच्या शिक्षा झाल्या. नंतर अंधारकोठडी. नंतर गंजी कपडे– म्हणजे गोणपाट नेसणे. मग पत्र येणं बंद. मुलाखती बंद. डोक्याचं तेल बंद. अंगाला साबण नाही. केसाला तेल नाही. केसाच्या झिपऱ्या झालेल्या. सबंध वर्षात कुणाचं पत्र नाही. आप्तांचं दर्शन नाही. आज मला आश्चर्य वाटतं– हे एक वर्ष मी कसं काढलं!

ठाण्याच्या नरककुंडातून येरवडा तुरुंगात माझा प्रवेश झाला. माझी आई म्हणजे सासूबाई. त्यांनाही सहा महिन्यांची शिक्षा होऊन त्या येरवड्याच्या तुरुंगात होत्या. त्यांना भेटायला मिळणार म्हणून आनंद झाला. सासूबाईंनी मला लाडकी लेक म्हणूनच घरात घेतलं होतं. मी त्यांना आईच म्हणे. त्यांनाही ते

आवडत असे. ती माझी लालन-पालनकर्ती आई मला भेटणार, तिच्या गळ्यात मी मिठी मारणार, या सुखद विचारानं मी येरवड्याच्या दरवाजात पाऊल टाकलं. अत्यंत आजारीपणामुळं आई वाचणार नाहीत म्हणून सरकारनं त्यांना मध्येच सोडून दिल्याचं कळलं. माझे हातपाय गळाले. कंठ दाटून आला. मधल्या काळात बधिर झालेल्या माझ्या मनोभावनांना तीव्रतेनं घरचं दुःख पहिल्या प्रथम जाणवलं नि माझ्या डोळ्यांत अश्रू दाटले. हुमसून हुमसून रडले. पुन्हा कळलं, की दिवसेंदिवस त्यांचा आजार वाढतोच आहे. अखेर आईंची नि माझी ताटातूट झाली ती झालीच.

माझे लहान दीर २६ जानेवारी, १९४३ ला धुळे तुरुंगाच्या भिंतीवरून उडी टाकून भूमिगत झाल्याचं मला येरवड्याला कळलं आणि आपणही तुरुंगातून पळून भूमिगत होऊन कार्य करावं, असा विचार प्रथमच माझ्या मनात चमकला.

पहिलं तंग वातावरण ढिलं झालं होतं. झरोक्यातून चांदणं झिरपावं तशा बाहेरील बातम्या झिरपून येऊ लागल्या. स्वजनांच्या व इतरही गाठीभेटी वाढल्या. त्यांतून चिठ्याचपाट्या हळूच सरकू लागल्या. तुरुंगातून पळून भूमिगत होण्याच्या माझ्या विचाराला पंख फुटू लागले. मनाशी निश्चय घुमू लागला—चलो बाहर, लगाव जान की बाजी!

एक दिवस पत्रीसरकारकडून चिठी आली, 'ताई– हुशार! लवकर येतो. तयारी झाली आहे. सावध राहा!'

मी डोळ्यांत प्राण आणून वाट बघत राहिले. पोलिसांच्या माराने माझी कंबर अधू झाली होती. माझ्या या कंबरेच्या दुखण्यानं पुन्हा जोर केला. ठणका, ताप आटोपेना. मला ससून हॉस्पिटलमध्ये हालवलं. वरच्या मजल्यावर दिवस-रात्र खोलीपुढं पोलीस-तुकडीचा खडा पहारा. पोलिसांना बिस्किटं, फळं, चहापाण्यात बुडवून बंधनं सैल केली. भूमिगतांनी पुन्हा संधान बांधलं. अचानक एक दिवस चिठी आली —तयारी पूर्ण झालीय. तुम्ही सायंकाळी बागेत फिरायची परवानगी काढा.

माझी प्रकृती लवकर सुधारावी म्हणून डॉक्टरांकडून परवानगी मिळाली. चार पोलिसांच्या पहाऱ्यात, संध्याकाळी सहा ते सात– एक तास हॉस्पिटलला

लागून असलेल्या बगिच्यात माझं फिरणं सुरू झालं आणि मार्गप्रतीक्षाही.

दुसऱ्या दिवशी सहा वाजता फिरण्यासाठी जिना उतरले, तो पोलिसांची दुसरी सुसज्ज तुकडी खाली दिसली. माझं मन साशंक झालं. मी तशीच डोळ्यांनी वेध घेत सावधपणे बागेत फिरत होते. अर्धा तास झाला असेल नसेल एवढ्यात एक कोरी करकरीत गाडी दवाखान्याच्या फाटकात शिरली. ती पाहताच पोलीस-तुकडी धावली. ब्रेक दाबले गेल्याचा आवाज झाला. मोटारीला पोलिसांनी वेढा घातला.

मला न्यायला येणारी ती हीच मोटार. पोलिसांनी मोटारीवर झडप घातली होती; पण त्यातून काही निष्पन्न झालं नाही. लोक आमचेच होते नक्की.मग बेत फसला का? विषण्ण मनानं माझा तापही वाढला व तगमगही.

सकाळी चहा व बिस्किटांचे पुडे कुणीतरी आणले आणि पोलिसांना त्यानं चहापान दिलं. मलाही चहा द्यावा, अशी इच्छा त्यानं व्यक्त केली म्हणून पोलिसानं दार ठोठावलं. मी उठले. चहा आणणारा चहा, बिस्किटं घेऊन माझ्या खोलीत आला आणि चहा देता देता चिठीही हळूच माझ्याकडं सरकवली.

त्या चिठीत लिहिलं होतं – आज सायंकाळी पुन्हा सावध असा.

सकाळपासूनच अंगात थोडा ताप होता; तरीही संध्याकाळी नाइलाजानं मी हळूहळू बागेत फिरू लागले. इतक्यात दोघे आले. त्यांनी दोन पोलीस व जमादार अशा तिघांना बोलत बोलत जरा बाजूला आडोशाला नेलं. इतक्यात पुन्हा दोघेजण विरुद्ध दिशेनं आले. ते पोलिसाला भिडले. पोलिसाची मानगूट पकडून व झटक्यात त्याला आडवा घालून एकजण उरावर बसला. दुसऱ्यानं मला फाटकाकडं बोट दाखवत खुणावलं – पळा पळा आणि पोलिसाचं मुंडकं दाबून क्लोरोफॉर्मचा रुमाल त्याच्या नाकावर दाबून धरला.

झटकन बाजूच्या फाटकाकडं बघितलं. सूट, बूट, हॅट, चष्मा लावलेला सायकलवाला मला खुणावून म्हणत होता – या या, पळा, जलदी पळा... मी धूम ठोकली. सायकलपाशी पोचेपर्यंत शिट्ट्यांचा फर-फर आवाज चारी बाजूंनी घुमला. दवाखान्यापाशी उभ्या असलेल्या तुकडीनं उड्या टाकून माझ्याकडं धाव घेतलेली मी बघितली. लगेच उडी मारून सायकलच्या दांड्यावर बसले.

साथीदारानं वेगानं सायकल दामटली.

काल मोटार हरली; पण आज सायकलनं ज़िंकलं!

## शब्दार्थ व टिपा :

**शिरस्त्राण**—डोक्याच्या रक्षणासाठी वापरायचे साधन. **सोजीर**—शिपाई. **जालिम**—दुष्ट; जुलमी. **संभ्रम**—मनाची गोंधळलेली स्थिती. **औरत**—स्त्री; महिला. **क्लोरोफॉर्म**—गुंगी येऊन शुद्‌ध हरपावी म्हणून वापरले जाणारे एक औषध.

**जान की बाजी लावणे**—प्राण पणाला लावणे; सर्वस्व अर्पण करण्यास तयार असणे. **संधान बांधणे**—जवळीक निर्माण करणे.

**चले जाव**—८ ऑगस्ट, १९४२ रोजी मुंबई येथे भरलेल्या काँग्रेसच्या अधिवेशनात गांधीजींनी ब्रिटिश सरकारला उद्‌देशून 'चले जाव' ही घोषणा दिली. **मार्शल लॉ**—अनन्यसाधारण परिस्थितीत शांतता व सुव्यवस्था टिकवण्यासाठी प्रसंगी लष्कराला बोलावण्याचा सरकारला अधिकार देणारा कायदा.

## प्रश्न :

१. 'चले जाव'ची घोषणा केल्यामुळे देशात कोणत्या घटना घडू लागल्या?
२. लेखिकेची जाज्वल्य देशभक्ती कोणकोणत्या प्रसंगांतून दिसून येते?
३. तुरुंगाच्या कोठडीत तिचा कोणकोणत्या प्रकारे छळ करण्यात आला?
४. लेखिकेचे आपल्या सासूबाईंवरील प्रेम व्यक्त करणारी कोणती वाक्ये या पाठात आली आहेत?
५. '...आज सायकलनं ज़िंकलं' असे लेखिका का म्हणते?
६. चिठ्याचपाट्या हा एक जोडशब्द आहे. असे पाच जोडशब्द सांगा व त्यांचा वाक्यात उपयोग करा.

## स्वाध्याय व उपक्रम :

१. आपल्या शाळेत 'ऑगस्ट क्रांतिदिन' साजरा करा. त्या दिवशी भारतीय क्रांतिकारकांच्या आठवणी वर्गसभेत सांगा.
२. 'चले जाव' ही गांधीजींची घोषणा होती. स्वातंत्र्यलढ्यात नेत्यांनी दिलेल्या घोषणा गोळा करा.
३. 'झंडा ऊँचा रहे हमारा' हे गीत पाठ करून ते सर्व मिळून म्हणा.

★ ★ ★





# ६. हरितक्रांतीचे प्रणेते

भालचंद्र फडके

**भालचंद्र दिनकर फडके** (जन्म : १९२५) मराठी साहित्याचे रसिक समीक्षक. सामाजिक व शैक्षणिक विषयांवरील विपुल लेखन. 'दलित साहित्य : वेदना व विद्रोह', 'मराठी लेखिका : चिंता आणि चिंतन', 'कथाकार खानोलकर', 'फुले-आंबेडकर : शोध आणि बोध', 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर' ही त्यांची पुस्तके.

वसंतराव नाईक हे महाराष्ट्राचे मुख्यमंत्री असताना त्यांनी जे शेतीविषयक प्रयोग केले त्यांचा परिचय या लेखात करून दिला आहे.

---

**डोंगरवाट** चढून वसंतराव क्षणभर थबकले. सूर्यबिंब हळूहळू वर येत होते. त्या कोवळ्या सोनेरी प्रकाशात 'गहुली' न्हात होती. चारी बाजूंनी डोंगराचा विळखा असलेले आपले गहुली खेडे, गावालगतचा डोंगरातून वाहणारा ओढा, डोंगरावरून छोटा घाट चढत गावाकडे हळूहळू येणाऱ्या गाड्या आणि

आपल्या मळ्यातल्या द्राक्षांच्या वेली पाहता पाहता त्यांचे मन रंगून गेले. ग. दि. माडगूळकरांचे 'गीत' सहज मनात आले. ते त्यांना खूप आवडे —

सतत वाहते उदंड पाणी
कुणी न वळवून आणी रानी
आळशास ही व्हावी कैसी
गंगा सुखदायी?

ते स्वतःशीच गुणगुणत पुढे निघाले. त्यांच्या एकदम लक्षात आले, की आपला मुलगा मागेच राहिला. मागे वळून पाहिले, तर तो दगड मारून कैऱ्या पाडत होता. तिथूनच ते ओरडले, "अरे, कैऱ्या पाहिजेत तर त्या व्यवस्थित काढून घे. दगड मारून झाडांना दुखवू नकोस." एवढं बोलून ते मागे फिरले, त्याला जवळ घेत म्हणाले, "अरे, या आंब्याच्या झाडांना मी आणि बाबासाहेबांनी डोक्यावरून वाहून आणून पाणी पाजलं आहे. छोटी छोटी रोपं आपल्या शेतात लावली आणि त्यांचे हे कैऱ्यांनी लहडलेले डेरेदार वृक्ष!" मुलगा त्यांना अधिकच बिलगला. वसंतरावांचे डोळे पाणावले. त्यांचे मन पार भूतकाळात गेले.

त्या वर्षी भीषण दुष्काळ पडला होता. झाडावर पाला नाही. डोंगरावर गवत तरी होते कुठे? जमिनी तहानलेल्या म्हणून ठिकठिकाणी तडकलेल्या. पशुपक्षी, माणसे् सगळी अन्नाच्या शोधात दाही दिशांना पांगलेली. काय करायचे? तेव्हा वसंतराव नाईक आपल्या सहकारी मंत्र्यांना म्हणाले, "संकटं जाण्यासाठी येतात. लोकांना सांगू या, जिद्द सोडू नका. दुष्काळ ही एक सत्वपरीक्षा आहे. माणसांना जगण्यासाठी आता काम तरी देऊ."

त्यांच्या मनात आले, ही सत्त्वपरीक्षा वारंवार का द्यायला हवी? हे बदलले पाहिजे. डोंगरदऱ्यांत पसरलेला हा कणखर महाराष्ट्र हिरवागार झाला पाहिजे. या देशातील शेती ओलिताखाली आणली पाहिजे. त्यासाठी जलसिंचन योजना हव्या, छोटे-छोटे बंधारे हवेत, विहिरी हव्यात, धरणे हवीत, मशागतीसाठी भरपूर नवी अवजारे हवीत, खते हवीत, बियाणी हवीत, शेतीमालाला चांगली किंमत हवी... पण हे सगळे व्हायचे कसे? दारिद्र्याशी, दुष्काळाशी युद्ध

पुकारले पाहिजे – म्हणजे क्रांती व्हायला पाहिजे. क्रांती! हरितक्रांती! हो,हरित-क्रांती!

या शब्दासरशी ते भानावर आले. पुन्हा त्यांची नजर 'गहुली'कडे गेली. ते खेडे पार बदलून गेले होते. मुलाशी बोलत बोलत ते चालू लागले.

ते घरी परतले तेव्हा उन्हे वर आली होती. घरात भेटायला आलेली माणसे वाटच पाहत होती. वसंतरावांचे मातीशी आणि माणसांशी जवळचे नाते होते. त्यांना भेटायला आलेल्या लोकांचे प्रश्न, त्यांची दुःखे समजून घेणे त्यांना आवडत असे. त्यांचे दुःख थोडे हलके करता आले तर त्यांना समाधान वाटे.

तसे ते कमी बोलत; पण त्यांचे हास्य आणि त्यांचे वागणे सर्वांना आकर्षून घेई. अनेकदा ते खेड्यापाड्यांत जात. तांड्यांत मिसळत. त्यांच्या वस्त्यांना भेटी देत. लोकांचे म्हणणे ऐकून घेत. त्यांना सांगत, 'बोलण्यापेक्षा कृतीवर भर पाहिजे. शेतीमध्ये आपण मागाल तेवढं मिळू शकतं. तिच्यामध्ये रक्त आटवणारा, घाम गाळणारा माणूस हवा. असा माणूस हाच हरितक्रांतीचा आधार!'

आपल्या गावाभोवतालच्या जंगलात शिकार करायची आणि शेतात काम करायचे हे वसंतरावांचे दोन आवडीचे उद्योग. आपल्या गावी 'गरिबांचा वकील' म्हणून त्यांनी लौकिक मिळवला. त्यांना पुसद नगरपालिकेचे अध्यक्षपद मिळाले आणि मग सामाजिक व राजकीय क्षेत्रांत ते गुंतले गेले. मंत्रिमंडळात 'कृषिमंत्री' म्हणून काम करण्याची त्यांना संधी मिळाली, तेव्हा त्यांना खूप आनंद झाला. १९६३ साली ते महाराष्ट्र राज्याचे मुख्यमंत्री झाले. शेती हा किफायतशीर व्यवसाय झाला पाहिजे असा त्यांचा आग्रह होता.

त्यांच्या अध्यक्षतेखाली एकदा शेतकऱ्यांची सभा चालू होती. एका पुढाऱ्याने म्हटले, ''पंजाबात हरितक्रांती झाली. पंजाबचा शेतकरी ट्रॅक्टर वापरतो.'' त्याचे भाषण मध्येच तोडून ते म्हणाले, ''ट्रॅक्टर हे एक साधन आहे. ट्रॅक्टर न घेतला तरी जमीन नांगरली जाणार नाही असे नाही. खरी गोष्ट अशी आहे, की शेतीकडं पाहण्याचा दृष्टिकोन त्यानं बदलला आहे. तो उपजीविकेसाठी शेती करत नाही, उत्पन्नासाठी करतो.''

वसंतराव नाईकांनी 'हरितक्रांती'चा आरंभ आपल्या गावापासूनच केला. गहुली हे कधी काळी वसलेले एक जुने खेडे. त्याला ना कसली आखणी ना रचना. अशा या गावातले रस्ते नीट आखणी करून तयार केले. रस्ता पक्का झाला. त्यावर एस.टी. बस धावू लागली. पुसदशी दळणवळण सहज होऊ लागले. गावात वसतिगृह सुरू केले. शाळा सुरू केल्या. साक्षरतेचे वर्ग-चालू करून त्यांत शेतीविषयक उपयुक्त माहिती दिली. विकास योजना यशस्वी-पणे राबवल्यामुळे गहुली गाव बदलून गेले. जो तो कामाला लागला. त्यामुळे गहुली गाव यवतमाळ जिल्ह्यातील 'सेवाग्राम' बनले. हाताला काम मिळाले. शेतात गाळलेल्या घामाला चांगला दाम मिळू लागला. घाम आणि पाणी पिऊन जमिनी तृप्त झाल्या. पिके डोलू लागली. वावरात गच्च पीक आलेले पाहून शेतकऱ्यांना केवढा आनंद झाला असेल!

कृषिमंत्री म्हणून ते जेव्हा काम पाहू लागले तेव्हा त्यांना आपल्या गावी केलेल्या कामाचा अनुभव उपयोगी पडला. 'हाताला काम आणि शेतीला पाणी' हे त्यांच्या विकासकार्याचे सूत्र होते. त्यांनी जलसिंचन योजना आखल्या, छोटे-छोटे बंधारे बांधले. शेतजमीन ओलिताखाली येत चालली, तसतशी शेती सुधारली. केवळ शेतीवर भागणार नाही म्हणून जिनिंग प्रेस, दूध योजना, कुक्कुटपालन, वराहपालन, खतनिर्मिती, बियाण्यांची निपज, मेंढीपालन इत्यादी अनेक पूरक व्यवसाय सुरू करण्यास उत्तेजन दिले. शास्त्रशुद्ध रीतीने शेती केल्याशिवाय शेतकऱ्यांची व पर्यायाने देशाची उन्नती होणार नाही, असे ते वारंवार सांगत.

१९६५ सालची गोष्ट! परदेशातून धान्य आयात करण्यात अडचणी आल्या. सर्वजण काळजीत पडले. वसंतरावांनी सर्व सहकाऱ्यांना बोलावले. ते म्हणाले, ''आता सर्वस्व पणाला लावू; परंतु अन्नधान्याच्या दृष्टीनं आपला देश स्वावलंबी झाला पाहिजे. उपलब्ध असलेलं पाणी जमिनीस देऊन जमीन पिकवू. त्यानं नाहीच भागलं, तर घाम गाळून जमीन भिजवू; पण पीक घेऊ, असा निर्धार आपण केला पाहिजे. सैन्याच्या आघाडीवर जर जवान कमी पडले, तर ते आपणांस दुसरे पाठवता येतील; परंतु शेतीवर उपजीविका

करणाऱ्या जनतेची शेती-आघाडी कोसळली तर ती आपणांस कधीही सांभाळता येणार नाही."

ग्रामीण भारताचा कायापालट व मनःपालट करण्यासाठी महाराष्ट्राचे मुख्यमंत्री वसंतराव सतत कार्यमग्न होते. ते म्हणत, "आपल्या देशाची शक्ती शेती व उद्योगधंदे यांच्या विकासावर अवलंबून आहे. निसर्गानं जी अलोट संपत्ती दिली आहे, तिचा कण अन् कण देशाच्या विकासासाठी वेचू या."



**शब्दार्थ व टिपा :**

**सत्त्वपरीक्षा**—कठोर परीक्षा. **वराह**—डुक्कर. **कार्यमग्न**—कामात गढून गेलेले. **पुसद**—यवतमाळ जिल्ह्यातील तालुक्याचे ठिकाण.

**प्रश्न :**

१. दगड मारून कैऱ्या पाडू नको, असे वसंतरावांनी आपल्या मुलाला का म्हटले?
२. दुष्काळ ही एक सत्त्वपरीक्षा आहे, असे ते का म्हणतात?
३. हरितक्रांती घडवून आणण्यासाठी कोणते प्रयत्न केले पाहिजेत?
४. वसंतरावांचे कोणते गुणविशेष तुमच्या लक्षात येतात?
५. वसंतरावांना 'हरितक्रांतीचे प्रणेते' असे का म्हटले आहे?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. तुमच्या गावात शेतीवर आधारलेले कोणते पूरक उद्योग सुरू करता येतील ते सांगा.
२. तुमच्या शाळेभोवतालचा परिसर रम्य व हिरवागार दिसावा यासाठी काय काय करता येईल ते सांगा.
३. दुष्काळाला धैर्याने तोंड देण्यासाठी तुमच्या गावाने कोणते उपाय योजले, ते आपल्या मित्राला पत्ररूपाने कळवा.

★ ★ ★



# ७. विसरभोळा गोकुळ

रा. ग. गडकरी

**राम गणेश गडकरी** (जन्म : १८८५; मृत्यू : १९१९) कवी, नाटककार व विनोदी लेखक. 'गोविंदाग्रज' या टोपणनावाने काव्यलेखन आणि 'बाळकराम' या टोपणनावाने विनोदी लेखन.

'वाग्वैजयंती' हा काव्यसंग्रह. 'पुण्यप्रभाव', 'एकच प्याला', 'भावबंधन', 'राजसंन्यास' इत्यादी नाटके. 'संपूर्ण बाळकराम' हे विनोदी लेखांचे पुस्तक.

हा नाट्यउतारा त्यांच्या 'प्रेमसंन्यास' या नाटकातून घेतला आहे. एखादया माणसाच्या विसरभोळेपणातून केव्हा केव्हा कशी गंमत होते, ते पुढील उताऱ्यात वाचा.

---

(गोकुळाचे घर. गोकुळ विचार करत उभा आहे.)

गोकुळ :(स्वगत) उपरण्याला गाठी मारून आठवण राहत नाही म्हणून स्मरणवही तयार केली; पण तिचाही उपयोग होत नाही. कित्येक गोष्टींचं टाचण करण्याची आठवण होत नाही, टाचून ठेवलेल्या गोष्टी पाहण्याची आठवण होत नाही आणि आजतर स्मरणवही कुठं ठेवली हेच स्मरत नाही. स्मरणवही सापडली म्हणजे विद्याधरांच्या भेटीचा दिवस आजचाच ठरवला आहे की नाही, याचा शहानिशा करून घेता आला असता. मला वाटते, आज त्यांनी यायचं असं आम्ही ठरवलं नाही. नाहीतर त्यांच्या नियमितपणावरून म्हणजे या वेळेस त्यांनी यायलाच हवं. का कबूल केल्याप्रमाणं येण्याचा त्यांना विसर पडला? या लोकांना आठवण राहत नाही, तर स्मरणवह्या का ठेवत नाहीत! (पडद्यात 'गोकुळ, अहो गोकुळ') आले वाटतं विद्याधर. (मोठ्याने) या हो, असेच नीट. (विद्याधर येतो.) या, बसा. मला वाटलं,



तुम्ही आता येत नाही म्हणून.

**विद्याधर** : एकदा कबूल केल्यावर माझ्याकडून दिरंगाई व्हायची नाही.

**गोकुळ** : बरं, आता आमचं कुटुंब गेलं आहे बाहेर सोबतिणीकडं बसायला. आणखी आपल्याला तिच्याबद्दल बोलायचं आहे, तेव्हा ती आली तर आपल्याला कळावं म्हणून सगळ्या दारांना कड्या आहेत की नाहीत ते पाहून येतो. मग बोलू अगदी मोकळ्या मनानं. (जातो.)

**विद्याधर** : मला इथं बसवून हा गृहस्थ बाहेर गेला खरा; पण परत यायची याला आठवण कशी होणार! मी गेलो असतो बरोबर तरी बरं झालं असतं. बरं, हा महात्मा आता काय बोलणार आहे याचा तर्कसुद्धा करता येत नाही. या आताच्या प्रस्तावनेवरून त्याच्या बायकोबद्दल बोलणार आहेसं दिसतं.(गोकुळ येतो.) या. आलातच ताबडतोब. मला वाटलं, पुन्हा यायचं विसरता वाटतं.

**गोकुळ** : छे, विसरतो कसचा! मी इतका विसराळू नाही. या लोकांनी उगीचं बभ्रा केला आहे झालं. मी हे तुम्हांला पूर्वीच सांगणार होतो; पण आठवणच राहिली नाही. बरं, विद्याधरपंत, तुम्हांला इथपर्यंत येण्याची तसदी देण्याचं कारण सांगतो आता. दोन-चार दिवसांच्या

बोलण्यावरून तुम्ही ताडलंच असेल, की आमच्या खटल्याचा प्रकार थोडासा विचित्र आहे.

विद्याधर : तुमच्यावर खटला वगैरे...

गोकुळ : गैरसमज झालाय तुमचा. खटलं म्हणजे कुटुंब. माझी बायको खाष्ट आणि भांडकुदळ आहे. तेव्हा तिला ताळ्यावर आणण्यासाठी काय युक्ती करावी? तुमच्यासारख्या पोक्त विचाराच्या माणसाचा या बाबतीत सल्ला घ्यावा म्हणून तुम्हांला ही तसदी दिली आहे. सांगा पाहू आता एखादा उपाय.

विद्याधर : अशा बायकोला हळूहळू धाक दाखवून...

गोकुळ : धाक दाखवण्याचं दूरच राहिलं. अहो, तोंडावाटे ब्र काढायची चोरी! घरात मला तोंड उघडायचा प्रसंग फक्त जेवतानाच काय तो येतो. फार कशाला; गेल्या वर्षी वायूमुळं एकदा तिची दातखिळी बसली. तेव्हा वैद्यबुवांना तिच्या प्रकृतीचं मान मी सांगितल्यामुळं ती माझ्यावर रागावली. दातखिळी बसली होती तरीसुद्धा स्वतःच वैद्यबुवांना समजावून सांगावं अशी तिची इच्छा दिसली. शेवटी त्याच संतापाच्या भरात तिची दातखिळी उघडली आणि तिचा त्या वेळचा आवेश पाहून भीतीनं बिचाऱ्या वैद्यबुवांची मात्र दातखिळी बसली. तिच्या भांडखोरपणाची साक्ष ही सारी आळीच देईल. शेजारच्या घरात तीन माणसांचं कुटुंब आहे. त्याच्यावर आमच्या हिच्या तोंडाची मात्राच चालत नाही; कारण त्या गृहस्थाला बोललेलं ऐकू येत नाही, त्याच्या बायकोला ऐकलेलं बोलता येत नाही आणि मुलीला बोललेलं आणि ऐकलेलं दोन्ही कळत नाही.

विद्याधर : ही दातखिळीची कथा म्हणजे खरोखरच 'दंतकथा' आहे झालं. मला वाटतं, तुमचा स्वभाव जरा विनोदी आहे.

गोकुळ : यात विनोद मुळीच नाही. नदीच्या पुरात वाहून जात असताना तिच्या वेगाला कसली उपमा द्यावी याचा विचार कोण करत

बसेल? खरं विचाराल, तर मी आता जिवालासुद्धा कंटाळून गेलो आहे.

विद्याधर: अरेरे! मग तुम्ही काडी का मोडून देत नाही?

गोकुळ : अहो, काडी मोडून द्यायला घरात काडीवर तरी सत्ता चालली पाहिजे ना! (हळूच मथुरा येते व विद्याधराला गप्प बसण्याची खूण करते.)

मथुरा : (स्वगत) माझीच निंदा चालली आहे वाटतं. ऐकलं पाहिजे सारं बोलणं.

विद्याधर: हे पहा गोकुळ, तुम्ही स्वतःच त्यांचा असा डांगोरा पिटू लागला तर लोकांना बरंच होईल. आपण आपला आब राखला पाहिजे. मागं कोण काय बोलेल, हे पाहिलं पाहिजे.

गोकुळ : पाठीमागं कोण काय बोलतं, याची मी मुळीच पर्वा करत नाही.

विद्याधर: पण आता हे पुरं करा. एवढ्यावरून मला त्यांची सहज कल्पना होईल.

गोकुळ : भ्रम आहे तुमचा.

विद्याधर: (स्वगत) आता विषय तरी बदलावा. (प्रकट) घर मोठं सुरेख आहे. काय भाडं देता याचं?

गोकुळ : ते सारं तिला माहीत. आमच्या हिशेबी कामाची निम्मेनिम वाटणी झाली आहे. खर्चाचं खातं तिच्या हाती असून जमा माझ्या हस्ते व्हायची. साखरेच्या गोण्या तिच्या कामी आणि मी नुस्ता ओझ्याचा बैल.

विद्याधर: (स्वगत) मी मुद्दाम विषय बदलतो आणि हा पूर्वपदावर येतो. (प्रकट) का हो, एवढ्या घरात्त सोबतीवाचून तुम्हांला भीती वाटत नाही?

गोकुळ एकटा असलो तर नाही वाटत भीती. पण ती जन्माची सोबतीण जवळ असली, तर मात्र भीती वाटते.

विद्याधर तुम्ही तुमच्या कुटुंबाला फार भिता असं दाखवता; पण तुमच्या



बोलण्यावरून तसं दिसत नाही.

गोकुळ : दिसत नाही? ती इथं असती तर दाखवलं असतं कसं काय आहे ते. अहो, ती इथं नाही म्हणून तर मी हे बोलतो आहे. मागं एकदा अशीच ती बाहेर गेलेली पाहून मी जयंतांना घरी आणलं आणि असाच याबाबतचा खल करत बसलो. अगदी असाच प्रसंग. पण मागं उभं राहून तिनं सारं बोलणं चोरून ऐकलं आणि मग कोण गहजब माझ्यावर! माहेरी जायला काय तयार झाली... बाकी ती हजारदा ही भीती घालते; पण खरोखरी काही कधी जात नाही. ती माहेरी गेली, तर तिच्याऐवजी माझातरी सासुरवास चुकेल खास.

विद्याधर : बरं, त्या अशा मागं उभ्या आहेत, हे तुम्हांला कसं कळलं?

गोकुळ : त्यात काही विशेष नाही. तिला पाहून जयंतांनी मला विचारलं, की हे बोलणं चोरून ऐकून तुझ्या बायकोनं तुझ्यावर तोंड टाकलं, तर काय करशील? मीही जोरानं म्हणालो, की तिनं तोंड टाकलं तर मी असं इकडचं तोंड तिकडं करून टाकीन! असं म्हणून असा झटक्यानं मागं पाहतो....

मथुरा तो मी ही अशीच मागं उभी. असंच ना? बोला. आता का वाचा बसली?

गोकुळ : भीमरूपी महारुद्रा, वज्रहनुमान मारुती... मी तुझ्या पाया पडतो. माझी चूक झाली. एवढा अपराध पदरात घे.

मथुरा : कशाला एवढं पण? तुम्हांला माझा सासुरवास होतो, नाही? आणि जन्माची सोबतीण नको, नाही का? ही मी जाते माहेरी. म्हणे, ती खरोखरच जात नाही. आता पहा डोळे फाडून. माझं अडलं आहे खेटर या घरात...

गोकुळ : हवा तो बोल मला दे. पण पाहुण्यांच्या देखत तरी नको.

मथुरा : आणि तुम्ही मात्र पाहुण्यांजवळ माझी नाही नाही ती नालस्ती करावी? पाहुण्यांचं मला काय भय? पाहुणे तुमचे.

गोकुळ : (एकीकडे) विद्याधर,आता पळा. त्या खिडकीतून, धुराड्यातून, जिथून सापडेल तिथून रस्ता गाठा आणि जीव वाचवा. आमची ओळख ठेवा. पळा.

मथुरा : माझे कान काही फुटले नाहीत; त्यांना कशाला जायला सांगता? मीच्र जात्ये आपल्या माहेरी. (रागाने आत जाते.)

गोकुळ : आज आपल्या दोघांचा पुनर्जन्म झाला. यमपुरीच्या वेशीपर्यंत माझ्या अशा कैक फेऱ्या झाल्या आहेत म्हणा; पण तुम्हांला हा प्रसंग जरा नवीनच आहे. मघाशी दार लावलेलं बघायला गेलो खरा; पण पाहायचं विसरलो, त्याचा हा परिणाम.

विद्याधर : पण याचा परिणाम काय होणार पुढं?

गोकुळ : आज ती माहेरी जाणार खास. आता काय करावं?

विद्याधर : बरं, यांचे वडील तरी चांगले सुखी आहेत का?

गोकुळ : सुखी आहे साधारण, पण तो हिला फार दिवस राहू देणार नाही. पक्का चिक्कू आहे तो. दसऱ्याचं सोनंसुद्धा त्याच्या हातून सुटत नाही. कोणी एखादा निरोप सांगितला तर त्यातलेदेखील चार शब्द दलालीदाखल ठेवून घेईल.

विद्याधर : मग आता असं करू... तात्यासाहेब वगैरे मोठ्या माणसांच्या सहीनं तुमच्या सासऱ्याला पत्र पाठवून त्यात सर्व हकीकत कळवू.

तुमच्या कुटुंबाला थारा देऊन चढवून ठेवू नये असं लिहू. म्हणजे तो समजूतदार असला, तर आपणच तिला इथं आणून पोचती करील. अशा निराधार स्थितीचा अनुभव आला, म्हणजे त्यांचा वरचढपणा आपोआप नाहीसा होईल.

गोकुळ : अरे बापरे! आली ती, जरा थांबा.

(मथुरा येते)

मथुरा : चला जरा आत. मला त्या भिंतीच्या लगीवरून माझी पेटी काढायची आहे, म्हणून भिंतीखाली या खुर्च्यांची उतरंड लावायची आहे. ओढा त्या खुर्च्या. (विद्याधरास) तुम्हीही उचला एक. तुमचंही अंग आहेच या चारगटपणात, तेव्हा तुम्हांलाही शिक्षा पाहिजेच. चला, बघता काय? माझी गाडी चुकेल. मी याच गाडीनं जाणार बाबांकडं.

गोकुळ : विद्याधर, चला उचला ते मेज, काही इलाज नाही.

(खुर्च्या ओढत सर्व जातात.)

**शब्दार्थ व टिपा:**

**टाचण** – टिपण. **खटले** – बायको; भानगडीचे, गुंतागुंतीचे काम. **कुटुंब** – बायको. **पोक्त विचार** – समंजसपणाचा विचार. **वायू** – एक आजार. **आब** – अब्रू; लौकिक. **खल** – चर्चा. **गहजब** – संतापाचे, चिडीचे ताडताड बोलणे. **लग** – खांबावर आडवी टाकलेली तुळई.

**शहानिशा करणे** – खात्री करून घेणे. **बभ्रा करणे** – बोभाटा करणे; सगळीकडे प्रसिद्धी करणे. **तोंडावाटे ब्र काढायची चोरी** – एकही शब्द उच्चारण्याची सोय नसणे. **मात्रा चालणे** – परिणाम होणे. **काडी मोडून देणे** – विवाहसंबंध तोडून टाकणे; घटस्फोट देणे. **तोंड टाकणे** – वाटेल ते बोलणे. **इकडचे तोंड तिकडे करून टाकणे** – अतिशय जोराने थोबाडीत मारणे. **वाचा बसणे** – एक शब्दही बोलता न येणे. **पदरात घेणे** – अपराध माफ करणे. **बोल देणे** – दोष देणे.

**स्वगत** – रंगभूमीवरील एखाद्या पात्राने इतर पात्रांना ऐकू येत नाही असे गृहीत धरून, पण प्रेक्षकांना ऐकू जाईल असे स्वतःशी बोलणे. **विद्याधर** – जयंतचा मित्र.

**जयंत** —तात्यासाहेबांचा भाचा. **भीमरूपी महारुद्रा, वज्रहनुमान मारुती** —मारुतीच्या स्तोत्रातील एक चरण. हे स्तोत्र म्हटल्याने भीती नाहीशी होते, अशी समजूत आहे. **तात्यासाहेब** —एक प्रतिष्ठित गृहस्थ. यांनी गोकुळला लहानपणापासून वाढवलेले असते.

## प्रश्न :

१. लोक स्मरणवह्या का ठेवत नाहीत, या गोकुळच्या प्रश्नाने का हसू येते.?
२. 'मी इतका विसराळू नाही,' हे गोकुळचे बोलणे लगेच खोटे कसे ठरते?
३. बायकोला ताळ्यावर आणण्याचे कोणकोणते उपाय विद्याधर सांगतो?
४. मारुतीचा धावा करण्याची पाळी गोकुळवर का आली?
५. पाहुण्यांदेखत फजितीचा प्रसंग गोकुळवर का ओढवला?
६. या पाठातील तुम्हांला आवडलेली विनोदी वाक्ये कोणती?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. पाठात आलेल्या वाक्प्रचारांचा उपयोग करून वाक्ये तयार करा व ती लिहा.
२. मनुष्याच्या स्वभावातील दोष, उणिवा यांचे फुगवून वर्णन केले, की विनोद उत्पन्न होतो. विसराळूपणा हा गोकुळचा स्वभावदोष आहे. त्याचे जेथे जेथे उल्लेख आले आहेत त्या त्या जागा शोधा आणि त्यातील विनोद समजून घ्या.
३. विसराळूपणा, चिक्कूपणा अशा एखादया स्वभावदोषामुळे काही गमतीदार प्रसंग तुमच्या अवतीभवती घडले असतील तर ते वर्गसभेत सांगा.
४. हा नाट्यप्रवेश प्रयोगरूपाने करून दाखवा.

* * *



# ८. बहाद्दर चिमण्या

आनंद यादव

**आनंद रतन यादव** (जन्म: १९३५) ग्रामीण जीवनाचे चित्रण करणारे कथालेखक व कादंबरीकार. 'हिरवे जग', 'मळ्याची माती' हे कवितासंग्रह. 'खळाळ', 'डवरणी', 'आदिताल', 'मातीखालची माती' हे कथासंग्रह. 'गोतावळा' ही कादंबरी आणि 'पाणभवरे' हे ललितलेखांचे पुस्तक.

ही कथा 'खळाळ' या कथासंग्रहातून घेतली आहे. रानातला साप चिमण्या गट्ट करण्यास चटावलेला होता; पण बहाद्दर चिमण्यांनी एकत्र येऊन सापाची खोड कशी मोडली, ते या कथेत वाचा.

---

**बाभळीच्या** फांद्यांचा हिरीच्या भोवतीनं वेढा घातलेला. हात लावायला गेलं तर काटं कचाचा टोचायचं. नुसती आत उतरायची वाट तेवढी मोकळी. मोटवान हिरीत डोकावून बघणारं... मोठ्या मगरीच्या पसरलेल्या तोंडागत. बाजूला आंब्याचं झाड. वाऱ्यानं कवातरी हलणारं. दुसरं झाड हुंबराचं. हिरीच्या काठातनं थेट वर उसळलेलं. त्यांच्यावर चिमण्यांचा तळ कायम आणि हिकडच्या बाजूला पाटावर उच्चच्या उच्च नारळीचं झाड! सापाच्या अंगावर असत्यात तसलं खवलं घेऊन वर चढलेलं.

दुपारची भाकरी खाऊन समदी घटकाभर आडवी पडली होती आणि बाहेर हुंबराच्या झाडावर चिमण्यांचा कालवा एकाएकी सुरू झाला. सावली सोडवत न्हवती, तरी मी उठून बाहेर हिरीजवळ आलो. भर उनात चिमण्या घरटी सोडून बाहेर आल्या होत्या.

हिरीत वाकून बघितलं. चिमणीचं पिलूबिलू काय पडलेलं दिसलं न्हाई. हुंबराच्या झाडाकडं न्ह्याळून बघितलं नि एकदम चमकलो. काळजाचं पाणी पाणी झालं!

हिरव्या फांदीच्या अंगावर दांडगाच्या दांडगा पिवळा साप वळवळत होता. दोन-तीन तिडं शेपटीकडच्या बाजूनं फांदीला पडलं होतं. फुडच्या बाजूनं फांदीच्या अंगाला गच्च धरून चिमण्यांच्या कोठराकडं सरकत चालला होता. काळ्या काळ्या दोन बारीक रेघा इजंगत तोंडातनं बाहेर येत होत्या आणि आत ज़ात होत्या. बिनझाकणारं बारकं डोळं अंगाच्या जरा जरा बाहेर आलेलं. अंगापरास डोसकं जरा मोठं... चिमण्या चटाटा उडायच्या, वरडायच्या. एका जागी येऊन कालवा करायच्या.

भराका वारं आलं नि धप्पदिशी साप खाली पडला. साळ साळ साळ करत हिरीच्या दरडीत गेला. हिरीची दरड मगरीच्या आ केलेल्या तोंडागत तशीच ऱ्हायली. चिमण्यांचा घोळका एकदम हुंबरावरनं दरडीपतुर सांडला नि परत येऊन पुन्ना बसला. वाऱ्यानं हुंबर सळसळला. पानं सटासटा एकमेकांवर बडीवली. चिमण्या घरट्यात जाऊ लागल्या. पुन्ना भाईर येऊ लागल्या...

माळाच्या शिवंला मी ढोरं चारत होतो. ईतईतभर गवात होतं. चिमण्या गवताचं बी टिपत होत्या आणि वघळीतनं नवं लाल पाणी वळवळत यावं तसा ह्यो गवतातनं सळसळला. वारा थरथरला. वाऱ्याच्या संगतीनं गवत थरथरलं.

चार-पाच दीस गेल्यावर चिमण्यांचा पुन्ना कालवा ऐकू आला. मी गडबडीनं उठून बघू लागलो. हिकडं तिकडं बघितलं, तर ह्यो आंब्याच्या झाडाच्या बाजूनं दरडीकडं येत होता. तोंडात पिसांचा मूठभर चोथा चिवचिवत होता. चिमणी धडपडायची नि ह्याच्या मानंला हिसका बसायचा. 'हा हा हा, साप साप' करून मी वरडलो. काठी आणायला पळालो नि बघता बघता ह्यो दरडीत मट्टमाया झाला.

सगळीकडं हजरी लागत होती. चिमण्या जिथं जातील तिथं ह्यो रिंगाण मारत होता. लांबपतुर फिरत होता. पर वसतीला मतुर हिरीच्या दरडीत. ही दरड जुनी. ती कुणी काढणार न्हाई ह्याची खात्री होती. चिमण्यांचं राज्य हुंबरावर होतं आणि हुंबराच्या भवतीनं ह्याचं...

मी उपड्या भुईमूग काढत होतो. सांज झाली. मी ढोरांस्नी दोन भारं येल न्हेऊन टाकलं आणि धावंवर थोड्या शेंगा भाजायला आणल्या.

सजावारी हुंबराच्या झाडाकडं बघितलं. चिमण्यांचा भिरा बाहेरच बसला होता. एखादी चिमणी घरट्यात जात होती आणि लगेच चिवचिवत भाईर येत होती. काळ्या मानंचं चिमणं गप बसलं होतं. चिमण्या हिकडनं तिकडनं क्वचित उडत होत्या... मी उठून धावंच्या गड्ड्याजवळ गेलो नि टक लावून बघितलं.

हिरीच्या दरडीवर दोन-तीन जागी अंडी पडून फुटली होती. पिवळा वगूळ घरंगळत खाली गेलेला. अंड्यांच्या पांढऱ्या कपऱ्या अधनंमधनं चिकटलेल्या. हिरीत वाकून बघितलं, तर राखट रंगाची पिसं पाण्यावर तरंगत होती. चिमण्या अधनंमधनं तिकडं बघत होत्या आणि अवचित आठवण होऊन घरट्यात जाऊन चिवचिवून बाहेर येत होत्या. आज त्याला बराच डल्ला मारायला साधलं होतं.

अजगरागत पडलेल्या डोंगरानं दीस गिळला. सगळीकडं काळोख पसरला. त्याच्याकडं बघत शिवार गप हुबं ऱ्हायलं. हळूहळू लांबचं एक एक झाड त्याच्या पोटात गेलं.

चिमण्या बाहेरच. काळोखात शेजारी शेजारी गप बसलेल्या. माझ्या हातातल्या खंदिलाकडं टक लावून बघू लागल्या. घरटी हिरीतल्या पाण्यावरच्या पिसांकडं बघत होती. हुंबराचं झाड अवघडून हुबं ऱ्हायलेलं. शेजारच्या उसाच्या लांब पानांच्या जिभा गप पडलेल्या. धावंकडचं उच्चच्या उच्च नारळीचं झाड आभाळातल्या चांदण्यांवर झडप घालायला टपलेलं... चिमण्या हे समदं बघत होत्या. भाईरच बसल्या होत्या. वाऱ्याच्या मंद झुळकीसंगं तोल जाईल तशा थरथरत होत्या. खंदील बारीक करून मी खोपीकडं गेलो.

माळावर दीस उगवलेला दिसला. चिमण्या रातभर भाईरच. जरा जरा झाडाभोवतीनं भुरुक भुरुक फिरायच्या आणि झाडावर येऊन बसायच्या. चिवचिवायच्या. हिकडं तिकडं बघायच्या. पुन्हा उडून चारीकडं जाऊन बघून यायच्या नि बसायच्या... आज त्यांचं डोळं निराळंच दिसत होतं.

ऊन झालं. मोटा सुटल्या. दीस डोसक्यावर आला, तरी हुंबराचं झाड दम धरून बसलेलं. त्याच्यावरच्या चिमण्या तशाच खिळलेल्या. ऊन मी म्हणत

होतं. टोची आ करून धावत होत्या; पर डोळं झापडत न्हवतं. ते तसंच कायमचं उघडं. हिकडं तिकडं बघणारं.

उनाची लाही जास्तच फुटली म्हणून खोपीत घटकाभर डुलकी काढायला गेलो.

बाहेर चिमण्यांचा कालवा ऐकू आला. मी ताडकन उठलो. बाहेर धावंवर आलो. धावंवरची धूळ वाळू तापल्यागत झाली होती. हुंबराच्या झाडावर तर एक चिमणी न्हाई.... समोरच्या वावरातनं कालवा ऐकू येत होता.

पिवळाजरद लांबडा वळवळत पळत होता. खाली रान चटकं देत होतं. वरनं चिमण्यांची चादर त्याच्यावर एकदम झडपत होती. चादरीखाली त्यो सबंदच्या सबंद झाकळून जात होता. चादर वर उचलली, की त्याच्यासरशी त्यो फुडच्या बाजूनं अर्धा वर उठायचा. दोन हातांच्या पंजाएवढी फडी निघायची. पिकलेल्या खाऊच्या पानासारखी पातळ. अगदी चांदाचा तुकडा! फडी निघाली, की तिच्यावर सात-आठ चिमण्या तुटून पडायच्या नि वर उडायच्या...



काळंभोर रान उनाच्या झळांनी थरथराय लागलेलं. मातीच्या अंगावर काटा आलेला. रानात झनापन चाललेली. सपासप फडी जमिनीवर पडत होती. चादर खालीवर झडपत उडत होती.

अर्ध्याला अधिक तास झाला. धावंवर माणसांचा तट हुबा ऱ्हायला. लांबडा भेंडाळत चालला; तरी फडी वर निघत होती. ठिसकारून खाली आदळत होती. एखादी चिमणी पडायची, उडायची. सगळ्या रानातनं झटापट चालली होती. भुईसरपट ढग जावा तशा चिमण्या त्याच्याबरोबर चालल्या होत्या.

लांबडा भुलला. चाल मंद झाली. समोरचं दिसंना. नुसता काळा ढग दिसत होता. जिकडंतिकडं चिमण्यांचं हातरूण पसरलं होतं. टोचींच्या चुका त्याच्या अंगात घुसत होत्या. फडीवरला धाचा आकडा रंगत चालला. लांबड्याला रानात भडोळी कुठंच गावंना आणि चिमण्यांचा भिरा तर समोरनं आडवा येऊन त्याला रानात मुरगळून घालत होता.

चाल अगदीच मंद झाली, तसा चिमण्यांचा घस झाला. पिवळ्या लांब देठाला त्या लागल्या. देठ फुडं फुडं सरकत चालला होता. फडी मंद निघत होती. कवा निघायची, कवा नुसतंच मुंडकं वर व्हायचं. दोन-चार कासरं घस तसाच सरपटत गेला नि बांधाच्या अगदी कडंला जाऊन थंड झाला. पिवळा देठ उताणा पडला. नुसती शेपटीकडची बाजू अधनंमधनं वळवळत होती.. तीबी घटकाभरानं थंड झाली.

घसाची चादर झाली नि तांबड्या झालेल्या टोचींचं खिळं आपल्या पखांवर पुसत बांधावर बसली.

माणसं हळूहळू रानातनं त्या बांधाकडं चालली. झनापन जिथं सुरू झाली होती, तिथनं लांबड्याची वळणं उठली होती. त्या वळणानं फुडं चालली. वाव-दीडवावाला चिमण्यांचा एक एक मुडदा दिसत होता. अशा नऊ-धा चिमण्या चाऊन चापलून टाकल्या होत्या. बांधाजवळ गेलो नि भिरा भुर्रकन उडाला. हुंबराच्या झाडावर जाऊन बसला.

...वाऱ्यानं हुंबराचं झाड सळासळा हाललं. पानं टपटपली. चिमण्या चिवचिवत बिनघोरी घरट्याशेजारी सरकल्या.

## शब्दार्थ व टिपा :

**कालवा** —गोंधळ; कर्कश चिवचिवाट. **दरड**—गवत, झाडझाडोरा माजलेली, खबदाडं असलेली विहिरीची चळण. **मट्टमाया झाला**—गडप झाला. **धाव**—मोटेचे बैल ज्या उतरणीने चालतात तो जमिनीचा विशिष्ट पट्टा. **सजावारी**—सहज. **भिरा**—थवा. **झनापन**—झटापट; झुंज. **भडोळी**—जमिनीतील भेग; चीर. **घस**—'घोस' या शब्दाचे ग्रामीण रूप.

**काळजाचे पाणी पाणी होणे**—अतिशय घाबरणे. **डल्ला मारणे**—लुटणे; अपहार करणे. **उन्हाची लाही फुटणे**—अतिशय कडक ऊन पडणे.

**लांबडा**—साप. (बरेच लोक भीतीने 'साप' हा शब्दही उच्चारायचे टाळतात आणि त्याऐवजी 'लांबडा', 'जनावर' असे शब्द वापरतात.)

## प्रश्न :

१. दुपारी एकाएकी चिमण्यांचा कालवा का सुरू झाला?
२. लेखकाने झाडावरील सापाचे हुबेहूब वर्णन कोणत्या शब्दांत केले आहे?
३. उंबराच्या भोवती सापाचे राज्य होते असे का म्हटले आहे?
४. चिमण्या व साप यांच्यातल्या झुंजीचे वर्णन करा.
५. चिमण्या दुबळ्या असूनही कोणत्या गुणांच्या जोरावर त्या सापाला मारू शकल्या?
६. या कथेतून तुम्ही कोणता धडा घ्याल?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. कालवा करणे, काळजाचे पाणी पाणी होणे, उन्हाची लाही फुटणे यांचा वाक्यांत उपयोग करा.
२. ग्रामीण बोलीत आढळणारे कितीतरी शब्द या पाठात आहेत. ते शोधून त्यांचे प्रमाण-भाषेतील प्रतिशब्द सांगा. जसे : येल वेल.
३. 'एकीचे बळ' या विषयावर २०-२५ ओळींचा निबंध लिहा.

★ ★ ★



# ९. लेखनाचा श्रीगणेशा

**लक्ष्मीबाई टिळक**

**लक्ष्मीबाई नारायण टिळक** (जन्म : १८६८: मृत्यू : १९३६) कविवर्य रेव्हरंड नारायण वामन टिळक यांच्या पत्नी. 'स्मृतिचित्रे' हे त्यांचे आत्मचरित्र. 'भरली घागर' हा कवितासंग्रह.

'स्मृतिचित्रे' या आत्मचरित्रातून हा उतारा निवडला आहे. टिळकांनी आपल्याला लिहाय-वाचायला कसे शिकवले, लेखनाचा आरंभ कसा केला याबद्दलचे अनुभव लेखिकेने या पाठात खेळकरपणे सांगितले आहेत.

---

**राजनांदगावी** असताना टिळकांच्या मनानं घेतलं, की आपल्या पत्नीला लिहाय-वाचायला शिकवायचं. टिळकांना लहान मुलांना चांगलं शिकवता येत असलं, तरी माझ्या बाबतीत ते अगदी निराळंच ठरलं. एक तर मी लहान नव्हते. दुसरं, मी बायको होते. तिसरं, मला हसू फार येत असे. त्या हसण्यानं माझ्या शिक्षणातही दगा दिला.

मला शिकवण्याचं ठरवल्यावर टिळकांनी पहिलीपासून सहावीपर्यंतची पुस्तकं – जवळ होते नव्हते तितके सर्व पैसे खर्च करून — एक दिवस खरेदी करून आणली. एका बाजूला टिळक बसले. पलीकडं मी बसले. मधे पुस्तकांचा ढीग घातला व आमच्या अभ्यासाला सुरुवात झाली.

व्याकरणापासून सुरुवात.

टिळक म्हणाले, "शब्द म्हणजे काय?"

मला सपाटून हसू लोटले. हा कसला बाई चमत्कारिक प्रश्न? शब्द म्हणजे शब्द!

"शब्द म्हणजे शब्द", मी उत्तर केलं.

"पण शब्द म्हणजे काय?"

"शब्द म्हणजे शब्द!"

"पण शब्द म्हणजे काय?"

पुन्हा माझं आपलं 'शब्द म्हणजे शब्द' ठरलेलंच. झालं! टिळक खूप संतापले. ते संतापत तसतशी मी हसू लागे. तसतसे ते आणखी संतापत.

शेवटी संतापाग्नीनं व माझ्या हास्याच्या वायूनं मोठा भडका उडाला, तो भडका होताच पुस्तकांचाही भडका उडाला! टिळकांनी सारी पुस्तकं टराटर फाडून टाकली व त्या चिंध्यांच्या ढिगाऱ्याला काडी पेटवून लावून दिली!

हा आमचा पहिल्या दिवसाचा 'अभ्यास'! आठ दिवसांच्या आत आपल्या बायकोनं आपल्यासारखं व्हावं असं टिळकांना वाटे. मी पडले मठ्ठातली मठ्ठ. तेव्हा ते व्हायचं कसं!

हळूहळू त्यांना आपली चूक कळून आली व त्यांनी मला 'अ' पासून 'ज्ञ' पर्यंत अक्षरं वळवण्यास दिली. ती झाल्यावर 'क' ची बाराखडी करून घेतली; पण हे शिक्षण देत बसण्यात त्यांना काही गंमत वाटेना व माझं शिक्षण तिथंच आटोपलं. मात्र यापुढं माझं वाचन पुष्कळ वाढलं आणि त्या वाचनात बाकीच्या बाराखड्या व जोडाक्षरं मला आपोआप आली; पण 'क्ष', 'ज्ञ', 'कै', 'खै' वगैरे मंडळी अजून माझी एखाद वेळेस फजिती करतात.

मासिक 'मनोरंजन'च्या दिवाळी अंकात 'करंज्यांतील मोदक' नावाची माझी एक कविता प्रसिद्ध झाली होती. ती कविता पुष्कळांना आवडली.

करंज्या केल्या म्हणजे त्यांच्याबरोबर एक लहानसा मोदक केलाच पाहिजे. पुरणाच्या किंवा गुळाच्या पोळ्या केल्या, की त्यात एक कानवला आलाच. पापड झाले, की त्यात एक लाटी तशीच राखून ठेवायची, ही जी आपली चाल आहे, तिचा अर्थ या कवितेत सांगितला आहे. मी पापड लाटत होते व दत्तू जाता येता लाट्या लाटत' होता. शेवटी सर्व पापड लाटून झाल्यावर एक लाटी उरली. त्याचा तिच्यावर डोळा होता. मी ती त्याला घेऊ देईना. तेव्हा त्याला हा सर्व शास्त्रार्थ सांगितला व ती कविता झाली. अर्थात तिच्यावर टिळकांचा सफाईदार हात फिरलेला आहेच.

ही कविता प्रसिद्ध झाल्यानंतर मला पंढरपूरहून एका बाईचं पत्र आलं, त्यात असा प्रश्न केला होता —

'मोदक बहु गोड असे, आकारहि सुबक साधला बाई!
तव भर्त्याचे त्याला साह्य नसे का, कथी मला ताई?'

हे पत्र वाचल्यावर मला प्रथम टिळकांचा मोठा राग आला. ते मला उगीचच प्रसिद्धी देत बसतात नि माझी अशी फजिती होते! पण माझ्या त्या कोपाग्नीची आच लागण्यास टिळक मजजवळ होते कुठे? ते भुईंज येथे जाऊन राहिले होते.

मला कवितेनं भंडावून सोडलं. पंढरपूरच्या पत्राला कवितेतच उत्तर देण्याचं माझ्या मनानं घेतलं व माझी प्रसिद्ध झालेली सर्वांत मोठी कविता 'पतिपत्नी' ही मी त्या वेळी लिहिली. ओळीच्या ओळी डोक्यात यायच्या. त्या मी रात्री खडूनं जमिनीवर उतरून ठेवायच्या.एखादया वेळेस जवळ टाक नसला, की आगपेटीची काडीच दौतीत बुडवून टाकाची भूक मी काडीवर भागवी. सकाळी ठोंबऱ्यांनी माझी ही रात्रीची बिगार कागदावर उतरून ठेवावी. असं करता करता पावणे तीनशे ओळींची कविता तयार झाली.

ती कविता व एक खरमरीत पत्र टिळकांना पाठवून दिलं.

मी एक सामाजिक कादंबरी लिहायला घेतली होती. लिहिता लिहिता एखादं जोडाक्षर मला मधेच अडवी. मग पुस्तकाची उलथापालथ करून तो शब्द कुठं आढळला म्हणजे माझी गाडी पुन्हा रुळावर येई. एक दिवस माझं कादंबरी-लेखन असंच अगदी जोरात चाललं असता मधेच घोडं अडलं. मला 'मनुष्य' काही काढता येईना. मी हाताशी होती नव्हती तेवढी पुस्तकं उलटीपालटी केली; पण 'मनुष्य' कुठं सापडेना! मी चिंतातुर होऊन बसले आहे, सभोवार पुस्तकं अस्ताव्यस्त पडलेली आहेत, घरात काम हाका मारत आहे, अशा वेळी ठोंबरे घरात आले. हा सारा देखावा पाहून ते म्हणाले, ''लक्ष्मीबाई, तुम्ही अशा का बसलात? काही हवं का तुम्हांला?''

''काय करू रे! मला हवा आहे मनुष्य. इतकी उलथापालथ केली, पण तो कुठं सापडत नाही.''

ठोंबरे माझ्यापुढं छातीवर हात ठेवून उभा राहिला.

''कशाला एवढी उलथापालथ करता? हा पहा, इथं उभा आहे मनुष्य.

आणखी हवे असतील, तर जरा बाहेर या. हवी तितकी मनुष्यं दाखवतो. काही तोटा नाही. अहो, साऱ्या जगात मनुष्यंच मनुष्यं. माणसांना काय तोटा?''

''अरे मला जगातली नकोत रे माणसं, पुस्तकातला मनुष्य पाहिजे.''

मग आम्ही दोघं खूप हसलो. ठोंबऱ्यांनी मला 'मनुष्य' काढून दिला.

एक दिवस माझी ती कादंबरी मी ठोबऱ्यांना वाचायला सांगितली. त्यांनी ती वाचून तिच्यावर खाली दिलेला अभिप्राय लिहून ठेवला —

अभिप्राय
सदर कांदबरी मी
संप्रुण वाचली. आशी
कांदबरी समंध्य मारा‍ष्ट्र
भाशेंत दूस्री दीस्णार नाही.
त्रिंबक बापूजीं टोंबरे
आहामंद नग्र
तारीख पंदरा ज्यून येकोणीशाच उदा

...जाईरात...

नावें नोदवा नावें नोदवा नावें नोदवा
अप्रतिम गंथ्र अप्रतिम गंथ्र अप्रतिम गंथ्र
ही संधीपू न्हायेणा स्नाहीं

वरील अभिप्रायाचं पान अजून मजजवळ आहे. कादंबरीला नाव ठेवलं नव्हतं. पण वर ठोबऱ्यांनी मोठ्या अक्षरांत 'लक्षुम्बाईची कांदबरी' असं ठेवलं होतं. ते पान काळाच्या उदरात गडप झालेलं आहे. त्या गोष्टीला आता पुष्कळ वर्षं झाली. आता मला खूपच चांगलं लिहिता येतं; पण तेव्हाचं माझं लिखाण म्हणजे पोरांच्या थट्टेचा एक विषय होता.

**शब्दार्थ व टिपा :**

**श्रीगणेशा** — आरंभ. **लाटी** — पापड करताना लाटायला सोईची व्हावी अशी केलेली

पिठाची गोळी. **लाटणे**—विशिष्ट आकार येण्यासाठी लाटण्याने लाटी गोल फिरवणे; लुबाडणे; लबाडीने, युक्तीने काढून घेणे. **भर्ता**—नवरा. **आच**—धग. **भंडावणे**—त्रास देणे; छळणे. **बिगार**—मोल न घेता केलेले काम.

एखाद्या **वस्तूवर डोळा असणे**—एखादी वस्तू प्राप्त करून घेण्याची इच्छा करणे. **गाडी पुन्हा रूळावर येणे**—खंड पडून स्थगित झालेले काम पुन्हा मार्गी लागणे. **घोडे मध्येच अडणे**—प्रगतीत खंड पडणे. **काळाच्या उदरात गडप होणे**—नष्ट होणे.

**टिळक**—प्रसिद्ध कवी (व ख्रिश्चन धर्माचे पुरस्कर्ते) नारायण वामन टिळक. **दत्तू**—टिळक पति-पत्नींचा मुलगा. **ठोंबरे**—त्र्यंबक बापूजी ठोमरे. 'बालकवी' या नावाने ते प्रसिद्ध. ते काही काळ टिळकांच्या घरी राहत होते. लक्ष्मीबाई त्यांना 'ठोंबरे' म्हणत.

## प्रश्न :

१. टिळकांकडून लिहाय-वाचायला शिकण्यात लक्ष्मीबाईंना कोणत्या अडचणी वाटत होत्या?
२. त्यांच्या पहिल्या दिवसाच्या 'अभ्यासा'ची अखेर कशात झाली?
३. लक्ष्मीबाईंचे शिक्षण कोणत्या टप्प्यावर थांबले? का?
४. 'मनोरंजन' मासिकातील कवितेचा विषय काय होता?
५. पंढरपूरहून आलेले पत्र वाचून लक्ष्मीबाईंच्या मनावर कोणता परिणाम झाला? त्यांनी काय केले?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. पाठातील वाक्प्रचारांचा उपयोग करून वाक्ये तयार करा व ती लिहा.
२. लक्ष्मीबाईंच्या लेखनातील चुकांची थट्टा करण्यासाठी ठोमऱ्यांनी त्यांच्या कादंबरी-वरील अभिप्राय अशुद्ध लिहिला. तो शुद्ध करून लिहा.
३. उशिरा मिळालेल्या अपुऱ्या शिक्षणामुळे लक्ष्मीबाईंचे लेखन साहजिकच शुद्ध नव्हते; पण त्यांच्या आठवणींचे 'स्मृतिचित्रे' हे पुस्तक त्याच्यातील उत्तम गुणांमुळे मराठी साहित्याचे भूषण ठरले आहे. मोजक्या शब्दांत व्यक्ती व प्रसंग डोळ्यांपुढे उभे करण्याचे सामर्थ्य, मनमोकळेपणा, खेळकर वृत्ती, साधी व सरळ भाषा असे त्यांच्या लेखनाचे गुण पाठात कोठे कोठे दिसून येतात, ते लक्षात घ्या.
४. 'स्मृतिचित्रे' (संक्षिप्त) हे पुस्तक वाचा.

* * *



# १० पाऊलवाटा

शंकर पाटील

**शंकर बाबाजी पाटील** (जन्म : १९२६) ग्रामीण कथालेखक व चित्रपटकथा-लेखक 'वळीव', 'आभाळ', 'ऊन', 'पाहुणी', 'निसर्गकथा', 'खट्याळकी' इत्यादी त्यांचे कथासंग्रह. 'टारफुला' ही कादंबरी. 'वावटळ', 'लक्ष्मी', 'पिंजरा' इत्यादी चित्रपटकथा आणि 'कथा अकलेच्या कांद्याची','गल्ली ते दिल्ली' इत्यादी वगनाट्ये. नांदेड येथे भरलेल्या ५९ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष.

हा उतारा त्यांच्या 'पाऊलवाटा' या संग्रहातून घेतला आहे. खेड्यातल्या पायवाटा पाहिल्यावर कोणकोणते विचार मनात आले ते या पाठात सांगितले आहे.

---

**रोज** डांबरी रस्त्यावरून चालताना एखाद्या दिवशी मला माझ्या खेड्यातील पायवाटांची आठवण होते. खेड्यातल्या पायवाटा मला एखाद्या चित्रासारख्या दिसतात. त्यांना रंग असतो, आकार असतो, गंध असतो आणि एक आगळं रूपही असतं. कधी ती एकांडी वाट चुकल्यासारखी दिसते, तर कधी कमळवेलीप्रमाणं तिचं जाळं विणलेलं असतं. ती कधी काळीभोर दिसते, तर कधी हळद लागलेल्या नवरीसारखी गोरीपान दिसते. एखादी वाट पायातल्या पायांत घोटाळते आणि एखादी धामणीगत वाकडी तिकडी पळताना आढळते. अनेक रूपं धारण करणाऱ्या या पायवाटा एकमेकींहून किती वेगळ्याअसतात!

नदी चढून वर येणारी मळीची वाट आणि काळ्या मातीतून जाणारी वाट, या दोन्ही वाटा एक नसतात. फोंड्या माळावरून जाणारी तांबडी वाट, पाणंदीतून चिखल तुडवत जाणारी काळी वाट आणि कुरणातून नदीला जाणारी वाट या सगळ्या पायवाटाच; पण प्रत्येकीचं वळण निराळं असतं, ठेवण निराळी असते.

सूर्योदयाच्या वेळी पायवाटेनं कधी टेकडी चढला आहात तुम्ही? निदान कधी सकाळच्या वेळी मळीच्या वाटेनं चाललाय? छाती- गळ्याएवढ्या



वाढलेल्या गवतातून जी नागमोडी वाट जाते, त्या वाटेनं संध्याकाळी फिरायला गेलाय? वाऱ्यानं दोन्ही अंगाला गवत डोलत असतं आणि वारा नाकातोंडात शिरत असतो. अशा वेळी या कुरणाच्या वाटेनं दूरवर चालण्यात जे एक सुख असतं, ते कधी तुम्ही अनुभवलंय? ज्वारी हुरड्याला आली असता बांधाच्या कडेनं जी पायवाट जाते, त्या पायवाटेनं जाताना पिकाचा जो वास येतो, त्यानं कधी तुमचं मन धुंद होऊन गेलं आहे? झुळझुळ वाहणाऱ्या ओढ्याच्या कडेनं जी मऊ चिखलवाट जाते, त्या वाटेनं कधी चालून तुमच्या पायाला चिखल लागला आहे? अशा वाटेनं चालताना आपल्या पायांच्या तळव्यांना जे सुख मिळतं, ते कधी उपभोगलं आहे? श्रावणातल्या पावसाचा खेळ कधी माळवाटेनं चालताना पाहिला आहे? पावसाची चिपळी येऊन जाते, पुन्हा ऊन पडतं आणि तांबड्या पाण्यानं माळावरच्या पायवाटा भरून जातात. माळावर दिसणारी पायवाटांची ही ओली नक्षी कधी तुम्ही डोळ्यांनी बघितली आहे? निसर्गाच्या या रांगोळीवरून कधी चालत गेला आहात? किती विविध रूपं घेतात या वाटा! नाटकातल्या स्त्रीपात्रानं प्रत्येक प्रवेशाला नवी साडी लेण्याची हौस दाखवावी, तशा या पाऊलवाटा प्रत्येक ऋतूबरोबर नवं रूप धारण करतात.

काही वाटा तर अशा असतात, की मृगात पाऊस बसला म्हणजे त्यांचे अवशेषही दिसेनासे होतात; पण थोडी उघडीप होते, पेरणी होऊन जाते, पिकं उगवून वर येऊ लागतात आणि या पायवाटा पुन्हा दिसू लागतात. पीक उगवून यावं तशा त्या उगवून येतात. धोरणी शेतकरी पेरणीच्या वेळीच आपल्या रानाभोवती कुंपण घालून त्यांना आत यायला बंदी करतो; पण पिकं उगवून वर आली, की या वाटा शेतकऱ्याचा डोळा चुकवून एखाद्या दिवशी आपसुख रानात घुसतात. काटेरी कुंपण असलं तरी ते मोडून आत शिरतात. अखेर शेतकऱ्याचा निरुपाय होतो आणि मग एक दिवस तोही त्याच वाटेनं आपल्या रानाकडं जाऊ लागतो. मुकाट्यानं आपल्या कोवळ्या पिकांचा एक आरा किंवा एखादी काकरी त्या वाटेला बक्षीस देऊन गप्प बसतो. काय करणार? वाटच हट्टी पडली ना!

अशा काही वाटा फार हट्टी आणि लागट असतात.एखाद्या रानात त्यांना एकदा प्रवेश मिळाला, की मग त्या तुमची पाठ सोडत नाहीत. घरातल्या मांजराला कितीही हुसकून बाहेर काढलं, तरी ते जसं पुन्हा घरात येतं, तशी एकदा शेतात शिरलेली वाट हुसकून बाहेर हाकलली तरी ती पुन्हा आत शिरतेच. तक्रारच सुरू झाली तर ती आपला वहिवाटीचा हक्क शाबीत करते. गावकरीही तिची कड घेतात आणि ती टिच्चून तुमच्या नाकावर बसते.

अशा या वाटा केवळ नुसत्या हट्टीच असतात असं नाही, तर मोठ्या आतल्या गाठीच्याही असतात. एखाद्या भाबड्या माणसाला त्या हातोहात फसवतातही. त्यांच्यावर विश्वास ठेवून रात्रीअपरात्री बाहेर पडणं जरा धोक्याचंच असतं. विशेषतः पायाखालची वाट आहे, या कल्पनेनं माणूस मनात शंका न घेता चालत राहतो आणि बरोबर त्यांच्या जाळ्यात अडकतो. एकीला दोघी, दोघीला चौघी अशा त्या सामील होतात आणि आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ सुरू होतो. चक्रव्यूहात सापडावं तशी माणसाची स्थिती होते. चोहोबाजूंनी या वाटा त्याला घेरून टाकतात आणि रात्रभर चालूनही माणूस एकाच ठिकाणी हिंडत असतो. रात्रभर आपण त्याच परिसरात फिरत राहतो आणि आभाळ फटफटल्यावर चकवा ध्यानी येतो.

काही माणसांचा जसा थांग लागत नाही, तसा वाटेचाही अंदाज लागत नाही. तिची लांबी कधी समजत नसते. कदाचित म्हणूनच पाऊलवाटांची लांबी मोजण्याच्या भानगडीत कोणी पडत नसावा. देशाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत जाणाऱ्या मोठ्या रस्त्यावर किमीचे दगड असतात; पण पाऊलवाटेवर किमीचा असा दगड अजून रोवलेला नाही. आपली मोजमापं कोणी घेऊ नयेत, याच बुद्धीनं ती वाकडी चालत असावी. एकंदर तिची चालच मोठी मजेशीर असते. जरा नीट जाऊन पुढं गेल्यासारखी ती करील, मग एकदम डाव्या अंगाला वळून लवणात गडपच होईल, तर पुढं काही अंतरावर उजव्या अंगाला वळलेली दिसेल. मध्येच उभी राहून मागं फिरून पाहील आणि पुन्हा चालू लागेल. अशा पाऊलवाटेला टेप कुठं लावायचा आणि तिचा अंदाज कसा घ्यायचा?

आणि मग जी लांबी आपण मनाशी गृहीत धरून चालू लागतो, ती सहसा कधी बरोबर नसते. अशा एखाद्या पाऊलवाटेनं परक्या गावाला तुम्ही कधी चालत गेला आहात? मग सांगा, 'कुत्र्याच्या भुकेवर' म्हणजे किती? 'माणसाच्या हाळीवर' म्हणजे किती? फार तर एखाद्या किमीचा आपण मनाशी विचार करत असाल, तर आपलं गणित एकदम चूक! अशा एखाद्या वाटेनं जाऊ लागावं आणि कुणालातरी विचारावं, ''बाबा, अमकं अमकं गाव किती लांब राहिलं?'' मग तो म्हणेल, ''हाय एका हाळीवर.''दुसऱ्या एखाद्याला विचारलं तर तो सांगेल, ''हाय कुत्र्याच्या भुकेवर.''

पण तुम्ही थकला असाल तर एवढीच खूणगाठ बांधा, की जेव्हा चांगली चार-पाच किमीची वाट आपल्याला चालायची असते, तेव्हा अशा वेळी जवळची शिदोरी वाटेवरच सोडावी, हे उत्तम!

या पाऊलवाटांमध्ये विविधताही खूप असते. काही वाटा सरळ असतात. त्या सरळमार्गी माणसाप्रमाणं नाकापुढं पाहून चालत असतात. काही मुळातच वाकड्या चालीच्या असतात. त्यांचं पाऊल कधी सरळ पडत नसतं. काही वाटा बाळबोध वळणाच्या असतात, तर काहींना लचकण्याची-मुरडण्याची हौस असते. काही खोडकर असतात आणि काही वाटा फार लोभसही

असतात. त्यांचा आपल्याला लळा लागतो.

मी अधूनमधून जेव्हा माझ्या गावी जातो, तेव्हा एकदा तरी कुरणाच्या वाटेनं मजेत फिरून येतो. गवताचा मातकट वास सगळीकडं दरवळलेला असतो आणि कुरणातली हिरवी वाट वळणं घेत पुढं जात असते. दिवस मावळून कडुसं पडलं तरी या वाटेनं आपण चालतच राहतो. संध्याकाळचा वारा भणाणत असतो, दोन्ही अंगांचं गवत डोलत असतं आणि आपल्या पायांची चक्रं फिरतच असतात.



काही वाटा मात्र निसरड्या असतात. आमच्या मळीची वाट अशीच आहे. पावसाळ्यात या वाटेनं चालताना फार जपून चालावं लागतं. जरा आपलं अवधान ढळलं तर पाय घसरलाच म्हणून समजा. ओढ्याच्या दगडावर परटिणीनं धुणं बडवावं, तसं अंग सुबकून निघतं. अशा या वाटेला शहाण्यानं दुरूनच नमस्कार करावा, हे बरं! तिच्या वाटेला न जाणं चांगलं.

युद्धकाळात शत्रुपक्ष जसा वाटेवर सुरुंग पेरून ठेवतो, तशा काही वाटा काटे पेरून ठेवतात. ते डोळ्यांना दिसत नसतात; पण बेसावधपणं तुम्ही पाय ठेवला, की ते बरोबर तुमच्या पायाच्या तळव्यात येऊन बसतात. कधी कधी तर वहाणा असूनही ते पायात मोडतात. तेव्हा एखादया पाऊलवाटेनं चालण्यापूर्वी तिचा जरा अंदाज घेऊन आपलं पाऊल टाकणं चांगलं.

काही वाटांचं नाक सारखं वर असतं. आपलं अस्तित्व सोडायला त्या तयार नसतात. आमच्या गावी आता स्टेशनला जायला गाडीवाट छान झाली आहे; पण गाडीवाटेला चिकटून मूळची पायवाटही जातेच! टोपपदरी लुगड्याला रुंद किनार असावी, तशी ती दिसते. गाडीवाट आली तरी मी इथनं हलणार नाही, अशा हट्टी वृत्तीनं ती सारखी धावतच असते. तिच्या या चिकाटीला आता काय म्हणावं?

आणि अशा काही पायवाटा असतात, की त्या चालताना लौकर ओसरतच नाहीत. नांदायला गेलेली लेक जेव्हा पहिल्यांदा माहेरी परत येते, तेव्हा वाट कशी सारखी पळत असते आणि चार दिवस माहेरचं सुख घेऊन ती जेव्हा सासरी जायला निघते, तेव्हा तीच वाट ओसरेनाशी होते. आपलं जन्मगाव सोडून दूर पोटार्थी भटकत असताना आपल्यालाही हाच अनुभव येत नाही का? गाव सोडताना किती अवघडल्यासारखं वाटतं आणि परत गावी जायला निघताना जीव कसा अधीर होऊन जातो! अशा या पायवाटा आपल्याशी किती एकजीव होऊन जातात!

मला अजूनही आठवतं, की एकदा माझी आई फार आजारी असताना मी जेव्हा गावी गेलो, तेव्हा माझ्याप्रमाणंच ती वाटही अवघडली होती. माझ्याबरोबर सुन्न मनानंच तीही चालत होती, ना बोलणं ना चालणं...

हा, जिव्हाळ्याची एखादी पाऊलवाट आपल्याशी बोलतेही! मी दोन वर्षांपूर्वी एकदा गावी गेलो आणि आगगाडीतून उतरून पायवाटेला लागलो. गावच्या ओढीनं भराभर पाय उचलत निघालो अन् चक्क मला एक हाक ऐकायला आली! मी मागं वळून बघितलं, तर त्या वाटेशिवाय दुसरं कोणीही तिथं नव्हतं. पायाखालची वाट आणि मी असं आम्ही दोघंच होतो आणि

एकाएकी बोलणं सुरू झालं--

"फार दिवसांनी आलास?"

"हो, काय करणार? रजा मिळत नाही ना!"

"रजा मिळत नाही, का गावची आठवण होत नाही?"

मी म्हणालो, "गावची आठवण होत नाही असं कसं होईल?"

इतक्यात गाव जवळ आलं आणि ती म्हणाली, "बरंय, ओळखदेख असू द्या"

तिचा निरोप घेऊन मी गावात शिरलो. कधी कुणाशी न बोलणारी पायवाट अशी त्या दिवशी माझ्याशी बोलली. आता जेव्हा जेव्हा मी गावी जातो, तेव्हा मला कोणाच्या सोबतीची आवश्यकता नसते.



**शब्दार्थ व टिपा :**

**एकांडी वाट**—आसपास दुसरी वाट नसलेली, एकाकी वाट. **धामण**—बिनविषारी सापाची एक जात. **मळी**—नदीकाठचे शेत. **फोंड्या माळ**—ज्याच्यावर सहसा काही उगवत नाही असा माळ. **पाणंद**—गावातून शेताकडे जाणारी वाट. **चिपळी**—लहानशी सर. **आरा**—पिकातील दोन ओळींतील अंतर. **काकरी**—पिकाची एक रांग. **लागट**—लाघवी; आर्जवी. **वहिवाटीचा हक्क**—बऱ्याच दिवसांच्या वापरामुळे प्राप्त झालेला मालकी हक्क **आतल्या गाठीचा**—मनाचा थांगपत्ता लागू न देणारा. **चकवा**—दिशाभूल; फसवणूक. **लवण**—सखल भाग. **कडुसं**—संधिप्रकाश; संध्याकाळचा धूसर प्रकाश. **सुबकणे**—सडकणे; बडवणे.

**खूणगाठ बांधणे**—पक्के ध्यानात ठेवणे. **नाकावर टिच्चून**-एखाद्याचा विरोध असतानाही, त्यावर मात करून. **नाक वर असणे**—ऐट, दिमाख असणे; ताठा असणे.

## प्रश्न :

१. खेड्यातल्या पायवाटा चित्रासारख्या वाटतात, असे लेखक का म्हणतो?
२. वाटांची कोणती विविध रूपे या पाठात आढळतात?
३. काही वाटा लागट व हट्टी असतात, असे लेखकाला कशामुळे वाटते?
४. आतल्या गाठीच्या पाऊलवाटा माणसाला कशा तऱ्हेने फसवतात?
५. रस्ते जसे मोजता येतात तशा पाऊलवाटा का मोजता येत नाहीत?
६. 'सासरी जायला निघाले की वाट ओसरेनाशी होते', या वाक्यातून माहेरून परतणाऱ्या मुलीची कोणती भावना व्यक्त होते?
७. या पाऊलवाटांचे व लेखकाचे अतिशय जिव्हाळ्याचे नाते जडले आहे, असे हा लेख वाचताना जाणवते, ते कशामुळे?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. या ललितलेखात खेडेगावातल्या पाऊलवाटांचे कितीतरी प्रकार सांगितले आहेत. मात्र येथे केवळ त्या पाऊलवाटांची यादी नाही, तर त्या सर्वच पाऊलवाटा माणसासारख्या जिवंत आणि भावना असलेल्या वाटतात. हे तुम्हांला या पाठात कोठे कोठे विशेष अनुभवाला येते ते लिहा.
२. तुम्हांला आवडणाऱ्या एखाद्या पाऊलवाटेचे चित्र रेखाटा.

* * *



# ११. हृदयाची श्रीमंती

**वि.स. खांडेकर**

**विष्णू सखाराम खांडेकर** (जन्म : १८९८; मृत्यू : १९७७) कादंबरीकार, कथाकार, लघुनिबंधकार, टीकाकार, चित्रपटकथा-लेखक.

'उल्का', 'दोन ध्रुव', 'पांढरे ढग', 'क्रौंचवध', 'अमृतवेल', 'अश्रू' इत्यादी कादंबऱ्या. 'नवा प्रातःकाल', 'कालची स्वप्ने' इत्यादी कथासंग्रह. 'चांदण्यात', 'वायुलहरी', 'मंझधार' इत्यादी लघुनिबंधसंग्रह. 'छाया', 'देवता', 'अमृत' इत्यादी चित्रपटकथा. 'ययाती' या कादंबरीला साहित्य अकादमीचा पुरस्कार व भारतीय ज्ञानपीठातर्फे 'ज्ञानपीठ पारितोषिक' मिळाले आहे.

ही रूपककथा 'वनदेवता' या कथासंग्रहातून घेतली आहे. या कथेत भिकाऱ्याच्या उद्गारातून जीवनातील एक सत्य जाणवते. ही कथा वाचा आणि ते समजून घ्या.

---

**एकदा** एक भिकारी भीक मागत राजधानीत आला. त्याने कधी राजा पाहिला नव्हता. राजवाडा पाहिला नव्हता. फिरत फिरत तो राजवाड्यापाशी आला.

त्या दिवशी त्याची झोळी जवळजवळ भरत आली होती. तिच्यात तांदूळ होते, जोंधळे होते, सत्तू होते, गहू होते. त्याला वाटले—अजून झोळीत दोन-तीन मुठी धान्य राहील. ते राजापाशीच का मागू नये? त्याच्या संग्रही कदाचित आपण कधीही न पाहिलेले धान्य असेल. ते आपल्याला पाहायला मिळेल, खायला मिळेल. शिवाय, 'महाराज, महाराज' म्हणून देशातले सारे लोक ज्याचे नाव आदराने उच्चारतात, तो कसा आहे, हेही आपल्याला सहजासहजी दिसेल; पण प्रवेशद्वारापाशीच रक्षकांनी त्याला रोखून धरले.

भिकारी हसत सुटला. या लोकांना वेड तर लागले नाही ना, असा विचार त्याच्या मनात आला. तो प्रमुख रक्षकाला म्हणाला, ''भाई, पागल आणि गुन्हेगार मोकाट सुटू नयेत, म्हणून पागलखाना आणि तुरुंग यांच्या दारांवर

रक्षक ठेवतात, असं मी ऐकलं होतं. राजवाड्यात त्यांची काय जरूर आहे? कारभाराच्या सोईसाठी राजानं तुरुंग आणि पागलखाना हे हल्ली राजवाड्यातच तर आणून ठेवले नाहीत?"

बोलता बोलता भिकाऱ्याने त्या रक्षकाच्या खांद्यावर हात ठेवला. त्याने तो झटकन दूर केला. चार फटके देऊन त्या भिकाऱ्याला हाकलून देण्याची रक्षकांच्या त्या नायकाला तीव्र इच्छा झाली. हाताखालच्या लोकांना तो तशी आज्ञा करणार, तो स्वतः राजाच तेथे आला.

राजा दरबारला जायला निघाला होता. राजाला पाहण्याची भिकाऱ्याची इच्छा ऐकताच तो म्हणाला, "चल माझ्याबरोबर."

आजचा दरबार राजाच्या वाढदिवसानिमित्त भरला होता. राजा सिंहासनावर जाऊन बसला. भिकाऱ्याला त्याने आपल्या जवळच्या आसनावर बसण्याची खूण केली. सारी सभा चकित होऊन पाहू लागली. मेघांच्या गडगडाटाला लाजवील असा टाळ्यांचा कडकडाट दरबारात झाला.

राजापुढे एकामागून एक उंची उपायने येऊ लागली. डोळे दिपवणारी रत्ने, एकदा तरी स्पर्श करून पाहावा असे वाटायला लावणारी वस्त्रे, नाना तऱ्हांच्या आणि नाना आकारांच्या असंख्य वस्तूंचे संमेलनच जणू काही आज तिथे भरले होते.

भेटी देण्याचा समारंभ संपला.

राजाने भिकाऱ्याकडे पाहिले. सुंदर सरपोसांनी झाकलेल्या विविध वस्तूंवरून भिकारी पुन्हा पुन्हा आपली दृष्टी फिरवत होता. राजा हसत हसत भिकाऱ्याला म्हणाला, "तुला काय हवं, ते माग."

भिकारी त्या साऱ्या उंची, सुंदर वस्तूंकडे टक लावून पाहत उभा राहिला.

"माग, हवं ते माग," राजा उद्गारला.

भिकारी स्तब्ध होता.

"माग, मित्रा, माग. या सुंदर वस्तूंपैकी कोणतीही."

भिकाऱ्याच्या ओठांची हालचाल झाली. आता तो काही बोलणार असे वाटताच, राजा एकदम दचकला.



"मागू? हवं ते मागू?" भिकाऱ्याने गंभीर स्वराने प्रश्न केला.

राजा मनात गडबडला. वाढदिवसाची भेट म्हणून आलेल्या साऱ्या वस्तूंकडे भिकारी मघापासून अधाशी नजरेने पाहत होता. राजाला वाटले — या साऱ्या उंची, मूल्यवान वस्तू त्यानं मागितल्या तर? आणि एवढ्या वस्तूंनी तरी त्याचं समाधान होईल, याची खात्री काय? बोलूनचालून भीक मागणारा माणूस! हा प्राणी कधीतरी उंची, झुळझुळीत वस्त्रं नेसला असेल काय? मुकुट राहू द्या; पण हाताच्या बोटात अंगठी घालण्याची संधीसुद्धा त्याला कधी मिळाली नसेल. या उपाशी आणि अधाशी माणसानं आपलं सारं राज्य मागितलं तर?

राजा काहीच बोलत नाही, असे पाहून भिकारी पुन्हा उद्‌गारला, "मागू? मागू महाराज?"

सारी सभा तटस्थ झाली. सभेतले पंडित मनात म्हणत होते — महाराजांनी उगीच शब्द दिला या वेड्याला. पूर्वी बळीनं वामनाला असंच वचन दिलं. त्या वचनापायी त्याला स्वतःला पाताळात गाडून घ्यावं लागलं.

राजाचे डोळे लकाकले. सभा अधिकच उत्सुक झाली.

राजा हसत म्हणाला, ''मित्रा, तुझ्या कुटुंबात किती मंडळी आहेत?''

''मला कुटुंबच नाही महाराज.''

''माझी स्थिती तुझ्या अगदी उलट आहे. सारी प्रजा हे माझं कुटुंब आहे. कुणी कुबेराची संपत्ती मला दिली, तरी या कुटुंबातल्या प्रत्येकाच्या वाट्याला कवडी कवडी तरी येईल की नाही, याची मला शंका आहे. म्हणून वाढदिवसाच्या निमित्तानं मी हे नजराणे स्वीकारत आहे.''

राजा थांबला. भिकारी गोंधळला.

राजा पुढे बोलू लागला, ''माझ्या या मोठ्या कुटुंबाकरिता मिळेल तेवढी



संपत्ती मला हवीच आहे. मित्र म्हणून आज तूसुद्धा मला काहीतरी भेट द्यायला हवीस. खरं की नाही?''

भिकाऱ्याच्या मुद्रेवर कारुण्याची छाया पसरू लागली. त्याने मान खाली घातली. थोड्या वेळाने मान वर करून त्याने राजाकडे अश्रुपूर्ण नेत्रांनी पाहिले.

भिकाऱ्यापुढे दोन्ही हात पसरून राजा उद्गारला, ''दे, मित्रा, मला वाढदिवसाची भेट दे. कसलीही – काहीही.''

भिकाऱ्याचे डोळे एकदम चमकले. एखाद्या विजयी सेनापतीप्रमाणे तो डौलाने पुढे झाला आणि खांद्याला अडकवलेली झोळी त्याने राजाच्या हातात रिती करायला सुरुवात केली. राजाची ओंजळ शिगोशीग भरली; पण भिकारी थांबला नाही. धान्य ओघळून खाली गळू लागले.

सारी सभा विस्मयचकित झाली. आपण एखादे अद्‌भुत स्वप्न पाहत आहो असेच प्रत्येकाला वाटत होते.

रिकामी झालेली झोळी खाकेला लावून भिकारी जायला निघाला. झपाझप पावले टाकत तो सभागृहाच्या प्रवेशद्वारापर्यंत गेला. साऱ्या लोकांचे डोळे त्याच्यावर खिळून राहिले.

कंपित स्वराने राजाने हाक मारली, ''मित्रा.''

भिकारी थांबला. मागे वळून तो राजाकडे पाहू लागला.

राजा उद्गारला, ''मित्रा, तुला काय हवं ते तू सांगितलं नाहीस मला. माझी परतभेट न घेताच, माझा राजवाडा न पाहताच तू निघालास?''

साऱ्या सभाजनांकडे एक कटाक्ष टाकत भिकारी परतला. तो पुन्हा सिंहासनासमोर येऊन उभा राहिला. सर्वांचे प्राण कानात गोळा झाले; पण भिकाऱ्याचे ओठ हलले नाहीत. त्याने काखेची झोळी काढली आणि राजाच्या उजव्या खांद्याला लावली.

सारी सभा भयभीत झाली. राजा एखाद्या पाषाणमूर्तीप्रमाणे स्तब्ध होता.

भिकारी राजाला म्हणाला, ''महाराज, आपलं कुटुंब फार मोठं आहे. खाली पडलेल्या या धान्याचा त्याला थोडा ना थोडा उपयोग होईल. ते ठेवण्यासाठी ही झोळी मी मघाशीच आपल्याला द्यायला हवी होती;

पण माणसाचं मन मोठं लोभी असतं. मी धान्य दिलं; पण झोळीचा मोह मला काही आवरता आला नाही."

भिकारी दिसेनासा होईपर्यंत सारे लोक त्याच्याकडे निश्चल दृष्टीने पाहत होते. तो दिसेनासा झाल्यावर त्यांनी राजाकडे पाहिले.

राजा सिंहासनावरून खाली उतरला होता. अश्रुपूर्ण नेत्रांनी गालिच्यावर पसरलेल्या धान्यांच्या कणांकडे पाहत होता. पाहता पाहता त्याने भक्तिभावाने आपले हात जोडले.

## शब्दार्थ व टिपा:

**पागलखाना**—वेड्यांचे इस्पितळ. **उपायन**—नजराणा; भेटवस्तू. **सरपोस**—आवरण; बासन. **रिती**—मोकळी. **शिगोशीग**—काठोकाठ; पूर्ण भरून सांडेतोवर. **निश्चल**—स्थिर.

**प्राण कानांत गोळा होणे**—ऐकण्यासाठी अतिशय उत्सुक होणे.

## प्रश्न :

१. रक्षकाला पाहिल्यावर भिकारी काय म्हणाला?
२. नजराणे स्वीकारण्याचे कोणते कारण राजाने भिकाऱ्याला सांगितले?
३. राजाला भेटीदाखल कोणत्या वस्तू आल्या होत्या?
४. राजाला भिकाऱ्याने कोणती भेट दिली? का?
५. या रूपककथेतून लेखकाला काय सुचवायचे आहे?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. 'राजा एखादया पाषाणमूर्तीप्रमाणे स्तब्ध होता', या वाक्यात लेखकाने राजाच्या स्तब्धतेचे सुंदर वर्णन केले आहे. अशा प्रकारची या पाठातील इतर सुंदर वाक्ये निवडा व ती वहीत लिहा.
२. या रूपककथेतील भिकारीच ही गोष्ट सांगत आहे, अशी कल्पना करून ती लिहून काढा.

* * *



# १२. पुस्तकांची दुःखे



**मं. वि. राजाध्यक्ष**

**मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष** (जन्म : १९१३) ललितलेखक व समीक्षक. 'आकाशभाषिते', 'खर्डेघाशी', 'शालजोडी' हे ललितलेखसंग्रह. 'अम्लान' हा टीकालेखांचा संग्रह. खेळकर शैलीने त्यांनी विविध विषय हाताळले आहेत.

हा उतारा 'खर्डेघाशी' या ललितलेखसंग्रहातून घेतला आहे. पुस्तकांनाही माणसांसारखी दुःखे असतात, ती आपण सहानुभूतीने जाणून घेतली पाहिजेत, हे या पाठावरून कळून येईल.

---

**पुस्तकालाही** आपल्यासारखीच काही शारीरिक दुःखे असतात. खरे म्हणजे ती उघड्या डोळ्यांना दिसावीत; पण नेहमीच दिसतात असे नाही. ती तऱ्हेतऱ्हेची असतात. ऊन त्यांना सोसत नाही, वारा त्यांना मानवत नाही. धूळ हा निसर्गाचाच भाग, धरतीमातेचा घराघरातून वावरणारा अंश. त्यानेही पुस्तके घुसमटतात. मग पाऊसपाण्याचे तर बघायलाच नको! त्याने पुस्तकाचा पाहता पाहता लोळागोळा होतो. त्याला बुरशी चढते. ती पुसण्याचा खटाटोप केला, तर पुठ्ठ्यावर हिरवट पांढुरके चट्टे उठतात. त्याची सगळी रया जाते आणि बापडे पुस्तक खंगत जाते. अशी या दमट हवेची कर्तबगारी! तिला साथ उंदीर, झुरळे व अन्य कृमिकीटकांसारख्या आपल्या निसर्गबांधवांची. यांतील प्रत्येक बंधुभगिनीचे वळण व तंत्र निराळे असते.

उंदराचे तंत्र काहीसे पेंढारीपणाचे. गरज लागेल तेव्हा एकदम हल्ला. जमेल ते कुरतडून, वसूल करून, मागल्या पायी पसार. पुन्हा नामानिराळा! पुस्तकांच्या बांधणीच्या खाचीत, कपाटांच्या सांध्यात जेथे कोन घडत असेल तेथे झुरळे अंडी घालतात. पुस्तक नीट झटकले तर अंड्यांची अखबी रांग परलोकाची वाट धरते.

दुखणी म्हटली की औषधे आलीच. पुस्तकांसाठी चूर्णे, औषधांचे फवारे न निघते तरच आश्चर्य! बरे, एवढे करूनही त्यांचा उपयोग होतोच असे नाही. उगाच पुस्तके कसल्या पांढऱ्या भुकटीने माखून निघतात आणि डागळतात. रूप जाते आणि कसले भलभलते वास येतात. कोऱ्या पुस्तकाला जो छान गंध असतो, तो केव्हाच उडून जातो. पुस्तकाला विरूप करणारी ही वैद्यकी अर्थात माणसांचीच. 'रोग पुरवला पण वैद्य आवर' असे पुस्तके पुटपुटत असतील. खुद्द वैद्यच रोगापेक्षा पुस्तकांचे धिंडवडे काढतो.

वाचकही पुस्तकांचे कमी हाल करत नाहीत. पुस्तके दुमडून वाचणे, आपण कुठवर वाचले आहे हे जरा वेळाने आठवण्याची खात्री नसल्यामुळे पुस्तक उघडून उपडे ठेवणे, पानाचा कान दुमडणे, दुसऱ्या कोणी घेऊ नये म्हणून गादीखाली दडवणे असल्या क्लृप्त्यांनी चांगल्या धडधाकट पुस्तकांचाही चोळामोळा होतो. अशी मुखपृष्ठ फाटलेली, खिळखिळी झालेली बापुडवाणी पुस्तके घरोघर दिसतील.

तसाच बालहट्टाचा प्रताप! पुस्तकाचे नाकडोळे ओरबाडले जातात, अवयव अलग होतात. पुस्तकाचे अक्षरशः खेळणे होते. मुलांचा खेळ होतो; पण बापड्या पुस्तकाचा मात्र जीव जातो!

बाळलीलांच्या वरच्या इयत्ताही आहेतच. आपण साक्षर झाल्याचा साक्षात्कार चिरंजीवांना होताच बाल वॉशिंग्टनच्या आवेशात पानापानांवर ते हत्यार चालवतात. इतिहासाच्या पुस्तकातील एखादया स्त्रीला मिशी कोरून पुरुषाची सुरत आणण्याची धिटाई येते. पौराणिक कथांतील एखादया पुरुषाला स्त्रीवेश चढवण्याचा मोहही होतो. ही चित्रकलेची त्यांची पहिली पावले असतील; पण त्यांचे चितादणे बिचाऱ्या पुस्तकांच्या उरावर का?

याला निदान पोरपणाची तरी सबब आहे; पण भल्या पोक्त माणसाने पुस्तकावर रंगीबेरंगी चिताडकाम करावे, म्हणजे काय? आणि तेही आपल्या ज्ञानाचे प्रदर्शन करण्यासाठी! ओळीओळीखाली बटबटीत लाल-निळ्या रेघा मारणे, समासात चमत्कारिक खुणा करणे आणि कहर म्हणजे शेरेबाजी करणे. असल्या चिताडण्याने बिचाऱ्या पुस्तकाच्या अंगावर काटा उभा राहत असेल!

माझे एक अतिचिकित्सक मित्र आहेत. प्रत्येक पुस्तकातील प्रत्येक विधानाशी त्यांचा ठाम मतभेद असतो. आणि ते कटाक्षाने तो मजकुराच्या बाजूला नमूद करून ठेवतात. परिणामी, छापील मजकुराइतकेच त्या हस्तलिखित गिचमिडीचे ओझे पुस्तकाला वागवावे लागते. त्याला दुसरे एखादे नितळ आणि निर्मळ पुस्तक पाहिल्यावर शरमल्यासारखे होत असेल, तोंड फिरवत असेल ते!

या अशा वाचकांच्या लेखनकर्मासाठी काही पुस्तकांच्या आरंभी व क्वचित शेवटीही एकदोन पृष्ठे कोरी सोडण्याची दूरदृष्टी दाखवलेली असते. त्यांचा उपयोग मात्र पुस्तकांवरील मालकीहक्क पुकारण्याकडेच केला जातो.हा पुकार तऱ्हेतऱ्हेचा असतो. कधी नुसतीच सही—कमीजास्त फर्डी, कधी संपूर्ण नाव, पदव्यांचा विस्तृत उल्लेख आणि संपूर्ण पत्ता. एवढेच नव्हे, तर पुस्तक केव्हा आणि कोठे विकत घेतले याचीही नोंद. पुस्तक केव्हा आणि कोठे वाचले याचाही कष्टाळू उल्लेख करणारे वाचक मला माहीत आहेत.

अशी पुस्तकांची आणखी दुःखे किती सांगू! माळ्यावर अडगळीत टाकलेली, गंजलेल्या मोडक्या ट्रंकांतून कोंबलेली, केरासारखी कपाटाखाली सारून ठेवलेली— असल्या पुस्तकांची काय अवस्था होत असेल! पुस्तकांच्या दुर्दैवाच्या दशावतारांपैकी एक म्हणजे फुटपाथवर उन्हातान्हात चटके खात तळत पडणे— तेही नको त्या पुस्तकांच्या संगतीत. भर उन्हात पानांचे पापड भाजले जाऊन पोळत राहण्याची पाळी त्यांच्यावर येते. शिवाय आपल्याला कोण उचलतो आणि कोणाच्या घरी जाऊन आपण पडतो याचाही त्यांना पत्ता नसतो. डोळ्यादेखत आपल्या स्वतःचा सौदा त्यांना पाहावा लागतो. पाडून मागणारी गिऱ्हाइके थोडी नसतात. हे सगळे त्यांना निमूटपणे सोसावे लागते.

पुस्तकांचे खरे मोल जोपर्यंत आपण ओळखणार नाही, तोपर्यंत पुस्तके अशीच झुरणार, तळमळणार आणि खंगणार. पुस्तकांचा नीट सांभाळ करायचा तो नुसता झुरळी-कसरीपासून नव्हे. ते दुखणे बरे करता येईल; पण वरून ग्रंथप्रेमाचा आव आणणारे वैरी मात्र नकोत!

## शब्दार्थ व टिपा :

**रया** —नूर;शोभा; कांती. **विरूप** —दिसायला वाईट. **क्लृप्ती** –शक्कल; चतुराईची योजना; कल्पना लढवून केलेली युक्ती. **सुरत** —चेहरा; मुद्रा. **कटाक्षाने** —आग्रहाने.

**धिंडवडे काढणे** —दुर्दशा करणे; अप्रतिष्ठा करणे. **साक्षात्कार होणे** —प्रत्यक्ष ज्ञान होणे.

**पेंढारी**—मोगलशाहीच्या पडत्या काळातील लुटारू लोकांचा एक वर्ग. शत्रूच्या प्रदेशात खंडणी वसूल करताना ते खूप लुटालूट करून धुमाकूळ घालत. यावरून लेखकाने 'पेंढारीपणा' असा शब्द वापरला आहे. **बाल वॉशिंग्टन** —जॉर्ज वॉशिंग्टन हे अमेरिकेचे माजी अध्यक्ष होते. ते लहान असताना त्यांच्या वडलांनी त्यांना कुऱ्हाड दिली. उत्साहाच्या भरात बाल वॉशिंग्टनने ती आपल्याच बागेतील दिसेल त्या झाडावर चालवली. **दुर्दैवाचे दशावतार** —विष्णूचे जसे दहा अवतार तशा दुर्दैवाच्या अनेक तऱ्हा असतात. नाना प्रकारची संकटे व दुःखे यांना उद्देशून हे शब्द वापरले जातात.

## प्रश्न :

१. पुस्तकावर कोणकोणत्या गोष्टींचा अनिष्ट परिणाम होतो?
२. 'वैद्यच पुस्तकांचे अधिक धिंडवडे काढतो', असे का म्हटले आहे?
३. वाचक पुस्तके हाताळताना कोणता निष्काळजीपणा दाखवतात?
४. लहान मुलांपासून पुस्तकांना काय उपद्रव होतो?
५. पोक्त माणसेही पुस्तकांवर अन्याय करतात, हे कशामुळे लेखकाला वाटते?
६. पुस्तकांच्या वाट्याला दुर्दैवाचे दशावतार कोणकोणते येतात?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. 'रोग पुरवला पण वैद्यआवर', ही म्हण भाषेतील कोणत्या म्हणीच्या आधारे तयार केली आहे? तिचा अर्थ समजून घ्या आणि अशाच आणखी काही म्हणी तयार करा.
२. 'तुमचा खेळ होतो; पण आमचा जीव जातो', या विधानामागे एक कथा आहे, ती मिळवा व वर्गात सांगा.
३. ग्रंथालयातील एक फाटलेले पुस्तक आपली कहाणी सांगत आहे, अशी कल्पना करा व ती आत्मकथा वीस-पंचवीस ओळींत लिहा.

★ ★ ★



# १३. बोलावणं आल्याशिवाय नाही!

दिवाकर

**शंकर काशीनाथ गर्गे** (जन्म : १८८९; मृत्यू : १९३१) नाट्यछटाकार व कथालेखक. 'दिवाकर' या टोपणनावाने लेखन. 'नाट्यछटा' हा वाङ्मयप्रकार त्यांनीच मराठीत आणला. 'दिवाकरांच्या नाट्यछटा' हा त्यांच्या नाट्यछटांचा संग्रह प्रसिद्ध. 'कारकून', 'सगळेच आपण माकडाचे वंशज' इत्यादी नाटिका. 'चुरगळलेला पतंग', 'आले कुठून, गेले कुठे?' व 'अहो मला वाचता येतंय' या कथा त्यांनी लिहिल्या.

नाट्यछटेत एकच व्यक्ती बोलत असते; पण दुसरी पात्रे व त्यांचे बोलणे प्रत्यक्षात नसूनही त्यांचा भास आपल्याला होतो. हे नाट्यछटेचे खरे वैशिष्ट्य.

ही नाट्यछटा 'दिवाकरांच्या नाट्यछटा' या पुस्तकातून घेतली आहे. शालेय जगातील **एक विद्यार्थि**-नट आपल्या अभिनयकौशल्याबद्दल कसे फुशारकीने बोलत आहे, हे या नाट्यछटेत वाचा.

---

...**सांगू** तरी आता किती जणांना! येतो तो हेच विचारतो... असतील! चार नाही छपन्न नोटिसा निघाल्या असतील! करायचंय काय मला त्यांच्याशी! जायचं असेल त्यांनी जावं खुशाल. मी थोडाच जातोय तसा!... अरे **राहयलं!** नाही तर नाही! इथं थोडंच माझं काही अडलं आहे! हपापलेली चार पोरं गोळा करा आणि हवं ते करा म्हणावं!... नाही सगळ्या गॅदरिंगच्या नाटकाचा बट्ट्याबोळ झाला तर नाव कशाला!... अबे जारे! मोठा शाळेचा मला अभिमान सांगतो आहे! आम्हांला तेवढा अभिमान असावा आणि शाळेला? तिनं हवं तसं आम्हांला लाथाडावं होय? ... अलबत! नाहीच भागायचं नुसत्या नोटिशीनं! काही थोडी-थोडकी वर्षं नाही कामं केलेली मी! अन् तीही पुन्हा अशी तशी?... चौथीत आल्याबरोबर धडाक्याला काम! सारख्या टाळ्या! तीच तऱ्हा दुसऱ्या वर्षी! पुढं पाचवीत येताच अश्वत्थाम्याचं काम! जो काही त्यात माझा आवाज लागला, तसा अद्याप एकाचाही लागला असेल तर

शपथ! अन् सहावीत संभाजीचं काम! वा! त्या वर्षी तर किती जणांनी आत येऊन सांगितलं, की तुझं काम छान झालं!... अरे त्या वर्षी तर स्पेशल पदक मिळालं मला! तेच पुन्हा सातवीत आल्यावर. पहिलं काम दुसऱ्याला चांगलं दिलेलं... पण त्याचं काढून मुद्दाम मला दिलं! नाटक पाह्यला कोणी अधिकारी आला होता. त्यानं काम पाहून... तोंडात बोट घातलं म्हणतात!... पुढं दुसऱ्या वर्षी... हं बरोबर! धुंडिराजाचं काम!... तेव्हा तर काय... हसता हसता पुरेवाट झाली लोकांची! अन् सगळ्यांत बाबा कळस झाला गेल्या वर्षी! माझं खलनायकाचं काम पाहून लोक इतके चिडले, की एकानं तर चक्क धोंडा मारला स्टेजवर!... तेव्हा बोला आता! इतका जिथं माझा अनुभव... आणि दर्जा वाढलेला, तिथं असल्या फासक्या-फुसक्या नोटिशीनं जायचं?... साफ नाही जायचा तसा मी! गुरुजींचा जर एवढा ऐटा आहे... सांगितलं ना, गुरुजींचा जर इतका तोरा आहे, तर साफ यायचा नाही मी बोलावणं आल्याशिवाय!



## शब्दार्थ व टिपा :

**गॅदरिंग**—स्नेहसंमेलन. **अलबत**—अर्थात; नक्कीच **खलनायक**—नाटक, कथा इत्यादी साहित्यातील दुष्ट प्रवृत्तीची व्यक्ती. **तोरा**—दिमाख; गर्व.

**बट्ट्याबोळ होणे**—संपूर्ण फजिती होणे. **तोंडात बोट घालणे**—आश्चर्यचकित होणे. **कळस होणे**—चांगल्या किंवा वाईट गोष्टीचा अतिरेक होणे.

**अश्वत्थामा**—कौरव-पांडवांचे गुरू द्रोणाचार्य यांचा मुलगा. **धुंडिराज**—राम गणेश गडकरी यांच्या 'भावबंधन' नाटकातील एक गोष्टीवेल्हाळ पात्र.

## प्रश्न :

१. 'नाहीच भागायचं नुसत्या नोटिशीनं',असे विद्यार्थि-नट का म्हणतो ?
२. त्याने संमेलनप्रसंगी झालेल्या नाटकांत कोणकोणत्या भूमिका केल्या?
३. 'एकाने चक्क धोंडा मारला स्टेजवर',असे विद्यार्थि-नट अभिमानाने का म्हणतो?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. बट्ट्याबोळ होणे, तोंडात बोट घालणे, कळस होणे या वाक्प्रचारांचा वाक्यात उपयोग करून दाखवा.
२. या नाट्यछटेतील टिबांनी दाखवलेल्या मोकळ्या जागा या इतर पात्रांच्या बोलण्याच्या निदर्शक आहेत. त्यांचा नीट विचार करून आपल्या कल्पनेने त्या मोकळ्या जागा भरा व तो संवाद लिहून काढा.
३. ही नाट्यछटा संमेलनप्रसंगी सादर करा.

★ ★ ★







# १४. व्रतवैकल्ये

**वि. दा. सावरकर**

**विनायक दामोदर सावरकर** (जन्म : १८८३; मृत्यू : १९६६) थोर देशभक्त व विचारवंत. 'स्वातंत्र्यवीर' ही पदवी बहाल करून जनतेने त्यांचा गौरव केला. कवी, नाटककार, निबंधकार.

'सावरकरांची कविता' हा त्यांच्या स्फुट कवितांचा संग्रह. 'गोमंतक', 'कमला', 'सप्तर्षी' ही खंडकाव्ये. 'संन्यस्त खड्ग', 'उ:शाप' ही नाटके. 'काळे पाणी' ही कादंबरी. '१८५७चे स्वातंत्र्यसमर', 'जोसेफ मॅझिनी' इत्यादी ग्रंथ. 'माझी जन्मठेप' हे आत्मपर पुस्तक.

हा उतारा त्यांच्या 'सावरकर-साहित्य' या पुस्तकातील काही लेखांचे संकलन करून घेतला आहे. या लेखात लेखकाने अंधश्रद्धा, वेडगळ समजुती, अनावश्यक धार्मिक विधी व कर्मकांड या गोष्टींचा विज्ञाननिष्ठ दृष्टिकोनातून नव्याने विचार करून त्यांतील फोलपणा दाखवला आहे.

---

**विज्ञानाने** जी सत्ये प्रत्यक्ष अनुभवाच्या आधारे निर्विवादपणे सिद्ध केली आहेत, त्यांच्या प्रचारास अडथळा करणारी व्रते साफ सोडून दिली पाहिजेत. व्रताने स्वतःचा, स्वतःच्या राष्ट्राचा किंवा एकंदर मनुष्यजातीचा काहीतरी प्रत्यक्ष लाभ होतो की नाही, ही कसोटी प्रत्येक व्रतास लावली पाहिजे.

पूर्वी मोठमोठ्या देवळांचे गाभारे अंधाराने भरलेले असत. घरातही समया, लामणदिवे, पणत्या यांचाच वापर होत असे. म्हणून त्या काळी वाती आवश्यकच असत. देवळात त्या उपयोगी पडत, घरातही लागत. पण हजारो वर्षांपूर्वीचे हातवातींच्या उजेडात चाचपडण्याचे युग आता बदलले आहे. जुन्या प्रख्यात देवालयांच्या गाभाऱ्यांतही आता विजेच्या दिव्यांचा भरपूर प्रकाश पडत आहे. खेड्यांतूनही घरोघरी, खोल्याखोल्यांतून विजेच्या दिव्यांचा लखलखाट झाला आहे. तिथेच एक लामणदिवा वा पणती, केवळ पणजोबांच्या वेळेस ती लावत म्हणून, लावून ठेवणे हास्यास्पद नाही काय? मोटारीला बैल लावणे किंवा मशीनगनचा गोळा धनुष्याच्या तातीने फेकणे हे जितके वेडेपणाचे तितकेच विजेच्या झुंबरांनी दिवसासारखा लख्ख प्रकाश पडलेला असताना गाभाऱ्यात समईचा वा लामणदिव्याचा मिणमिण नंदादीप उगीच धुरकटत ठेवणे हेही वेडेपणाचे आहे.

मनुष्यजातीचे अल्पस्वल्प हित साधता येईल अशा रीतीने हे व्रत आचरावे. वाती करायला लागणाऱ्या वेळात टकळीवर सूत कातावे आणि ते एखाद्या प्रामाणिक, गरीब विणकरास दान द्यावे किंवा ते सूत स्वतः मागावर विणावे आणि ती खादी एखाद्या सच्छील, गरजू कुटुंबास भेट म्हणून द्यावी.

तीच गोष्ट लाख दूर्वांची. तास-तासभर परड्यातून नि खिंडारातून गवताची एकेक काडी खुडत वेळ गमवायचा आणि तो भारा गणपतीच्या डोक्यावर द्यायचा! त्या भाऱ्याखाली गणपतीची मूर्ती गुदमरून जाते. गणपती का गवत खातो? गवताचा भारा वाहायचाच तर तो गाईला तरी वाहावा. ते गवत खाऊन गाय प्रसन्न होईल व दूध देईल.

हिरव्या गवतासंबंधी किंवा वनस्पतीसंबंधी व्रत करायचे, तर विळा घेऊन रानात जावे आणि हिरवेगार गवत कचाकच कापून त्याच्या पेंढ्या गाईस घालाव्या. आपल्या अंगणात स्वतः पाणी घालून फुलवाडी लावावी आणि मालती, सोनचाफा, जाईजुई, गुलाब अशी सुंदर सुंदर फुले प्रत्यही देवास वाहावी. साऱ्या फुलांचा देवावर उगीच ढीग रचू नये, तर देवघरात शोभतील तितकीच तिथे वाहावी आणि बाकीची घरात फुलपात्रांतून कुशलपणे मांडावी

किंवा त्यांचे हार करावे. आपण स्वतः पाणी घालून वाढवलेल्या लतावेलींच्या ताज्या, टवटवीत फुलांचे गजरे करावे आणि ते प्रेमाने आपल्या भगिनींना केसांत गुंफण्यासाठी द्यावे-मग त्या जिथे जिथे वावरतील तिथे तिथे सुगंध दरवळत राहील, प्रसन्न वातावरण निर्माण होईल. आरोग्य व आनंद देणाऱ्या अशा सौंदर्याची पूजा हेही एक व्रतच आहे.

वडा-पिंपळांना लाख प्रदक्षिणा घालायच्या, यासारख्या व्रतांनाही हीच कसोटी लावावी. आपल्या उष्ण प्रदेशातील लोकांना वडा-पिंपळांसारखे विशाल विस्ताराचे वृक्ष त्यांच्या शीतल छायेमुळे वत्सल वाटावे, हे स्वाभाविकच आहे. अशा वृक्षांविषयी कृतज्ञता वाटणे हेही साहजिकच आहे; पण त्यासाठी त्या वृक्षांचा देवच करून टाकणे, हे बुद्धिहीनतेचे लक्षण आहे. विशाल नि उपयुक्त वृक्षांची मनुष्याला उपयुक्त होईल अशी लागवड करणे, त्यांची जोपासना करणे हे योग्यच आहे. वडा-पिंपळांसारख्या झाडांखाली वाटसरूंना जशी छाया मिळते, तशाच त्यांच्या जीर्ण झालेल्या प्रचंड फांद्या कोसळून प्रसंगी त्यांचा प्राणही जातो. ती बिचारी झाडे काही जाणूनबुजून असे करत नाहीत. त्यांना प्रदक्षिणा घातल्या काय किंवा न घातल्या काय, फांद्या पक्क्या आहेत तोपर्यंत छाया देणे, त्या पोखरल्या की उन्मळून पडणे ही त्यांची भावनाशून्य क्रिया आहे.

चंद्र, सूर्य, शनी, मंगळ हे ज्योतिर्गोल नसून देव आहेत, मनुष्याच्या स्तुतीने ते प्रसन्न होतात आणि निंदेने संतापतात, अशी पूर्वी जगभर समजूत होती. पण आता प्रयोगांनी हे सिद्ध झालेले आहे, की सारे ज्योतिर्गोल हे निर्जीव पदार्थ असून त्यांची गती व स्थिती गणिताच्या कठोर नियमांनी होत असते. त्यांच्या प्रकाशाचे व घर्षणाचे मनुष्यावर होणारे परिणाम हे मनुष्यांच्या स्तुतिनिंदेने, दगडास तेलशेंदूर फासल्याने, शनिवार-मंगळवारी उपाशी राहिल्याने, एखाद्या पोथीच्या पारायणाने लेशमात्रही बदलू शकत नाहीत. त्यांचे परिणाम टाळण्याचा मार्ग पोथ्यांतील भाकडकथांप्रमाणे वागणे हा नाही; तर गणित, रसायन, वैद्यक या शास्त्रांचे नियम समजून घेऊन त्यांच्या आधारे उपाय योजणे हा आहे. मनुष्याला हे ज्ञान झाले असूनही पूर्वीचे अज्ञान उराशी बाळगणे आणि

जुनीपानी व्रतवैकल्ये करत राहणे ही असत्याचीच पूजा आहे.

वडाची पूजा करण्याने जर देव पावतो, सापाला दूध पाजल्याने जर देव पावतो, तर अनाथ अर्भकास दूध पाजल्याने तो देव काय पावणार नाही? तान्हेल्याला पाणी, तापलेल्याला छाया, अज्ञान्याला ज्ञानदान, मरणाऱ्याला प्राणदान ही पुण्यकृत्ये करणे हे व्रतच नव्हे काय? झाडून साऱ्या धर्मांतून ही कृत्ये पुण्यकृत्येच समजलेली आहेत. झाडांत, पशूंत, सापांत, दगडांत, मातीतही जर देव आहे, तर मनुष्यातही तो आहेच आहे. म्हणून मनुष्याची सेवा करण्याच्या व्रताने कोणत्याही व्रतापेक्षा अधिक फल मिळालेच पाहिजे.

अमुक प्रकारची लोकसेवा करा, हा आग्रह नाही. तुम्हांला व्यक्तिशः झेपेल ती लोकसेवा करा; पण लोकांचे हित होईल असेच एखादे व्रत धरा. त्यामुळेच राष्ट्रसेवा घडेल आणि मनुष्यजातीचीही सेवा घडेल.

### शब्दार्थ व टिपा :

**व्रत** —स्वेच्छेने करायची धार्मिक कृत्ये, उपासना, नियम. **व्रतवैकल्ये** —विविध प्रकारची व्रते. **तात** —दोरी (धनुष्याची). **ज्योतिर्गोल** —ग्रह व तारे. **पारायण** —धार्मिक ग्रंथाचे आरंभापासून अखेरपर्यंत टप्प्याटप्प्याने केलेले वाचन. **लेशमात्रही** —अगदी थोडेसेसुद्धा **भाकडकथा**-निरर्थक,कंटाळवाण्या कथा.

### प्रश्न :

१. कोणती व्रते टाकावी आणि कोणती स्वीकारावी यासंबंधी कोणत्या कसोट्या लावाव्या असे सावरकर म्हणतात?
२. वाती करायला लागणारा वेळ कोणत्या सत्कार्यात खर्च करावा?
३. वडा-पिंपळासारख्या वृक्षाचा देव करणे लेखकाला का मान्य नाही?
४. सर्व व्रतांत अधिक फल देणारे व्रत कोणते?

### स्वाध्याय व उपक्रम :

१. 'सच्छील'. हा शब्द 'सत्' आणि 'शील' या दोन शब्दांनी तयार झाला आहे. 'सत्' या शब्दास पुढील शब्द जोडून असे शब्द तयार करा — जन, मार्ग, आचार, मती.
२. 'विज्ञानयुगातील उपयुक्त व्रते' या विषयासंबंधी वर्गसभेत चर्चा योजा.

* * *



# १५. तुषारांचे वैभव

## गंगाधर गाडगीळ

**गंगाधर गोपाळ गाडगीळ** (जन्म : १९२३) शहरी मध्यमवर्गीय जीवनाचे चित्रण करणारे कथाकार, कादंबरीकार, टीकाकार.

'मानसचित्रे', 'कडू आणि गोड', 'तलावातील चांदणे', 'कबुतरे', 'गुणाकार' इत्यादी कथासंग्रह. 'लिलीचे फूल' व 'दुर्दम्य' या कादंबऱ्या. 'खरे सांगायचे तर', 'बंडू' इत्यादी विनोदी पुस्तके. 'साता समुद्रापलीकडे', 'गोपुरांच्या प्रदेशात' ही प्रवासवर्णने.

हा उतारा 'गोपुरांच्या प्रदेशात' या पुस्तकातून घेतला आहे. दक्षिणेतील कावेरी नदीवर बांधलेल्या 'कृष्णराजसागर' या धरणाचे व त्याच्या भोवतालच्या बागेचे वर्णन या लेखात केले आहे.

---

**म्हैसूरहून** कृष्णराजसागर अदमासे वीस किलोमीटर आहे. तीस-चाळीस मिनिटांत मोटार तेथे जाऊन पोचते. तेथे कावेरीला एक प्रचंड धरण बांधलेले आहे. 'कृष्णराजसागर' हे नाव म्हैसूरच्या आधीच्या महाराजांच्या नावावरून त्याला मिळाले. हिंदुस्थानातल्या फार मोठ्या धरणांपैकी हे एक आहे. हे बांधायची कल्पना मोक्षगुंडम विश्वेश्वरय्या यांची आणि ती त्यांनीच तडीस नेली.

धरणाच्या अगदी कडेला मोटार थांबली आणि खाली उतरताच आम्हांला त्याचे विराट दर्शन घडले. आपल्या काळ्या पत्थराच्या रुंद छातीने त्याने पाण्याचा केवढातरी लोट अडवून धरला होता आणि तो अडवलेला पाण्याचा लोट अगतिकपणे मागे वळून जमीन बुडवत दूरवर वेडावाकडा पसरला होता. किंचितसे हेलावणारे आणि उन्हाची लकाकी पृष्ठभागावर नाचवणारे ते पाणी अगदी शांत, निरुपद्रवी वाटत होते. पक्षी तिरप्या झेपा घेऊन त्या पाण्यातले मासे वेचू पाहत होते आणि झटकन दिशा बदलत आकाशात चढत होते. पाण्याच्या लाटा कृष्णराजसागराची काळी भिंत चाटत होत्या.'चुळुक चुळुक'

असा आवाज करत होत्या.

धरणावरून आम्ही पलीकडल्या बाजूला खाली उतरलो आणि वृंदावन बागेत प्रवेश केला. ही बाग दोन्ही बाजूंनी मध्याकडे उतरत्या असलेल्या कावेरीच्या पात्रातच बनवलेलो आहे. बागेत गेले म्हणजे मनुष्य पायऱ्यापायऱ्यांनी उतरत मध्याकडे जातो. मध्यभागी धरणातून सोडलेले कावेरीचे पाणी बाग दुभंगून पुढे वाहत जाते. बागेचे प्रतिबिंब आपल्या हृदयात साठवते. आपल्या झुळझुळत्या दर्शनाने बागेची प्रसन्नता आणि सौंदर्य वाढवते. बागेत उड्या मारत वाहत येणाऱ्या पाण्याच्या असंख्य प्रवाहांना चुकलेल्या मुलांप्रमाणे आपल्या पोटात घेते आणि बागेच्या रोशणाईसाठी वीज निर्माण करण्याकरिता खाली शिवसमुद्रमला जाते.

धरणाच्या कडेकडेने जाणाऱ्या रस्त्याने चालून या प्रवाहापलीकडे जाता येते. अधिक हौशी मनुष्याला पलीकडे न्यायला संथपणे पुढे सरकणाऱ्या होड्या आहेत आणि फरफरत घाईत जाणाऱ्या छोट्या मोटार-बोटीदेखील आहेत.

पलीकडे गेले, की बाग पायऱ्यापायऱ्यांनी चढत वर जाते. या बागेत हिरवळीचे चौकोन आणि वर्तुळे आहेत. त्या हिरवळीच्या तुकड्यांत मधूनमधून फुलझाडांचे वाफे आहेत. पानांनी डवरून निघालेल्या वेली तेथे रांगतात आणि कमानींवर चढतात; पण मुख्यतः तेथे भर आहे तो सुरूच्या झाडांवर. या झाडांना तेथे अनेक आकार दिलेले आहेत. त्यांतली काही चर्चच्या मिनारांप्रमाणे उंच व निमुळती होत गेलेली आहेत. काही छोटी घुमटाच्या आकाराची आहेत. त्यांतली काही अगदीच डुबरी आहेत. काही जरा उंच आहेत. काही जास्त डेरेदार आणि गोल आहेत, तर काही कमी डेरेदार आणि टोकदार शेंड्यांची आहेत. अनेक आकार त्या झाडांना देण्यात आलेले आहेत आणि कोन साधून ती अशा प्रकारे लावण्यात आलेली आहेत, की त्यामुळे अनेक रेखीव आकृत्या निर्माण व्हाव्या. या सुबक, हिरव्यागार, नाजूक आणि भुरभुरीत पानांच्या झाडांनी या बागेला काही विशेष शोभा आणलेली आहे.

या हिरवळीतून अनेक रेखीव रस्ते परस्परांना काट देत बागेतून गेलेले आहेत. ते रस्ते कधी नुसतेच, तर कधी पायऱ्यापायऱ्यांनी उतरत बागेच्या

मध्याकडे जातात, पाण्याच्या कडेला जाऊन थबकतात, त्याच्या कडेकडेने वाहत जातात.

अशी ही बाग सुंदर आहे. या बागेत खेळणाऱ्या, झुळझुळणाऱ्या, कोसळणाऱ्या, थुईथुई नाचणाऱ्या पाण्याने या बागेला अवर्णनीय शोभा प्राप्त करून दिलेली आहे. या सबंध बागभर कारंज्यांचे ताटवे नुसते फुलून राहिलेले आहेत. कारंज्यांच्या कुंडांत पाण्याची फुले फुललेली आहेत. कारंज्यांचे फवारे उंच जाऊन आपले पिसारे वाऱ्यावर डोलवत राहतात. कारंज्यांच्या फवाऱ्यांतून झुलत्या कमानी निर्माण झाल्या आहेत. तरते घुमट बांधले गेले आहेत आणि पाण्याचे छोटे छोटे प्रवाह ठिकठिकाणी वाहत आहेत. कुठे ते कुंडांत विसावतात, कुठे उंचावरून स्वतःला खाली लोटून देतात, कुठे उतारावरून घसरतात, तर कुठे छोट्या छोट्या पायऱ्यांवरून खाली कोलमडतात. या पाण्याच्या प्रवाहांतून फेसाचे मोती सारखे ओघळत असतात आणि मध्येच एखाद्या थेंबाच्या आणि धारेच्या पोटात मावळत्या सूर्याचा तिरपा किरण शिरताना दिसतो. मग रत्ने विरघळत आहेत असे वाटू लागते आणि उडत्या कारंज्यांच्या भोवती तर इंद्रधनुष्ये फेर धरून नाचतात असा भास होतो.

त्या परस्परांना काटणाऱ्या रेखीव रस्त्यांवरून आम्ही सावकाश रमतगमत खाली उतरलो. वाटत होते, की कारंज्यांच्या फवाऱ्यांवर हात धरावा, कारंज्यांच्या घुमटांत जाऊन बसावे, नाहीतर हलक्या रबरी चेंडूप्रमाणे त्या फवाऱ्यांवर उडत राहावे; पण वाऱ्याबरोबर येणाऱ्या तुषारांच्या थंड स्पर्शावरच समाधान मानून घ्यावे लागत होते.

कारंज्यांवर प्रकाशझोत सोडणारे दिवे, डोळ्यांत खुपू नयेत अशा प्रकारे रंगवलेले व ठेवलेले पाहून मनाला बरे वाटले.

येताना होडीतून यावे अशा बेताने आम्ही चालतच पलीकडल्या बाजूला गेलो. पलीकडे सुरूची उंच निमुळती झाडे होती आणि त्यांच्यामध्ये कारंज्यांनी एक सुरूचे बन निर्माण केले होते. एक हिरवे होते तर दुसरे पांढरे. तेथे एक नोकर चाव्या फिरवून फवाऱ्यांची उंची कमीजास्त करून तीत संगती निर्माण करत होता. सुरूच्या झाडांचे आकार आणि त्यांमध्ये उडणाऱ्या फवाऱ्यांच्या



आकृती यांमध्ये सर्वत्रच सुसंगती राखण्यात आली होती. जेथे सुरू घुमटासारखे होते तेथे कारंज्यांचे फवारेदेखील घुमट बांधत होते. जेथे सुरू मिनारासारखे उंच गेले होते, तेथे कारंज्यांचे फवारेदेखील कोसळणारे मिनार उभारत होते.

एका कारंज्याच्या कुंडाशेजारी आम्ही बसलो. त्या कुंडात कोसळणाऱ्या तुषारांनी फेसाची फुले फुलत होती. जवळच पाण्याचे प्रवाह होते. त्यांची बुरबुर बोबड्या कानगोष्टी करत होती. पायऱ्यापायऱ्यांवरून फेसाळत कोलमडणारा एक प्रवाह पाहून वाटत होते, की असंख्य शुभ्र यक्षबालके कोलांट्या उड्या मारायचा खेळ बेभानपणे खेळत आहेत. दुसरा प्रवाह उंचावरून खाली पडत होता. त्या पाण्याच्या रुळणाऱ्या पडद्यावर समांतर रेशमी रेषा उमटल्या होत्या

आणि खाली फेसाची झालर तर सारखी विसकटत होती. आणखी एक प्रवाह उतरणीवरून घसरत होता. त्याचे अनेक पदर एकमेकांवर तिरपे चढत होते. मधेच त्यांना मुरड पडत होती आणि मधेच त्यांचे विणकाम झाल्यासारखे वाटत होते.

आम्ही ज्याची उत्सुकतेने वाट पाहत होतो ते थोड्या वेळाने घडले. दाटणाऱ्या काळोखात पांढऱ्या दिव्यांचे एक मोहोळ चमकू लागले. धरणावरची ती दिव्यांची रांग, बाजूलाच दिव्यांनी झगमगणारे म्हैसूर सरकारचे राजेशाही वृंदावन हॉटेल आणि बागेतले हे दिव्यांचे मोहोळ! कारंज्यांतले पाणी संपून जणू त्यांतून नुसते तेजच उधळले जाऊ लागले आणि यक्षनगरीचे अद्‌भुत वातावरण सगळीकडे पेटले. पलीकडच्या बाजूला लाल, हिरवे, पिवळे, निळे असे रंगीबेरंगी दिवे चमकू लागले. कोणी म्हणाले की आमच्या बाजूचे रंगीबेरंगी दिवे पेटणार नाहीत. त्यामुळे पलीकडे जाण्याकरिता आम्ही होडीची वाट पाहू लागलो; पण होडी बेटी येईच ना! आम्ही खूप वेळ थांबलो. होडीवाल्याला हाक मारू लागलो; पण छे! ती मोटार-बोट फरफरत आमच्याकडे येत आहे असे वाटे आणि ती परत जाई.

ढग जमू लागले. पावसाची चिन्हे दिसू लागली. आम्ही अधीर झालो. शेवटी चालत जाण्याचा आम्ही निश्चय केला. तेव्हा मात्र होडी आली आणि आम्ही होडीत उड्या घेतल्या.

धीरे धीरे होडी चालू लागली. समोर दिव्यांची यक्षसृष्टी, तिचे पाण्यातले पुसट हलते प्रतिबिंब आणि मध्ये प्रकाशझोताने उजळलेल्या कारंज्याचा सर्वांत उंच फवारा. तो आपला तेजाळ पिसारा हवेत डोलवत होता आणि त्याच्या कोसळत्या तुषारांचा एक सुंदर पडदा तयार झाला होता. त्या पडद्याला भेदून आमची होडी पलीकडे गेली आणि तुषारांचा शिडकाव आमच्या अंगावर झाला. होडीने असेच सारखे सावकाश चालत राहावे असे वाटत होते.

**शब्दार्थ व टिपा :**

**विराट** —भव्य; प्रचंड. **अगतिकपणे** —निरुपायाने. **डुबरी** —खुजट; ठेंगू. **संगती-सुसंगती** —एकमेकांशी असलेला मेळ.

**मोक्षगुंडम विश्वेश्वरय्या**–सुप्रसिद्ध स्थापत्यशास्त्रज्ञ. यांना 'भारतरत्न' हा सन्मान देण्यात आला. **यक्ष** –हे मानवापेक्षा श्रेष्ठ मानले जातात. ते सुंदर असून त्यांच्या अंगी अद्‌भुत शक्ती आहे, अशी समजूत आहे. यावरून सुंदर व अद्‌भुत दृश्याला लेखकाने 'यक्षनगरी', 'यक्षसृष्टी' असे म्हटले आहे. आणि कोसळणाऱ्या प्रवाहावरील फेस व तुषार यांना 'यक्षबालके' म्हटले आहे.

## प्रश्न :

१. धरणाने अडवलेल्या पाण्याच्या लोटाचे वर्णन कोणत्या शब्दांत केले आहे?
२. वृंदावन बागेची शोभा वाढवण्याकरिता सुरूच्या झाडांचा कसकसा उपयोग केला आहे?
३. कारंज्याच्या कुंडाशेजारी बसल्यावर लेखकाला कोणते दृश्य दिसले?
४. 'यक्षनगरीचे अद्‌भुत वातावरण' असे कशाबद्दल म्हटले आहे?
५. 'तुषारांचे वैभव' हे शीर्षक या पाठाला का दिले असावे?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. (अ) बागेसंबंधी 'वाफे', 'ताटवे' असे शब्द पाठात आले आहेत. असे आणखी शब्द पाठात शोधा आणि तुम्हांला माहीत असलेले असे इतरही शब्द सांगा.
(आ) 'लोट' हा शब्द पाण्याच्या प्रवाहाचा उल्लेख करताना वापरतात. 'झोत', 'लोळ' व 'ओघ' यांचा उपयोग योग्य शब्दांसमोर करून वाक्ये तयार करा.
२. 'कारंज्यांच्या भोवती इंद्रधनुष्ये फेर धरून नाचतात', 'फेसाची फुले फुलत होती' अशी डोळ्यांपुढे चित्र उभी करणारी अनेक सुंदर वाक्ये पाठात आली आहेत; ती शोधा व त्यांचे सौंदर्य समजून घ्या.
३. जवळच्या एखादया उदयानाला भेट दया आणि त्याचे वर्णन वीस-पंचवीस ओळींत लिहा.

★ ★ ★



# १६. रुस्तुम-ए-हिंद

**बाबा आमटे**

**मुरलीधर देवीदास आमटे** (जन्मः १९१४) कुष्ठरोगपीडितांची सेवा करण्यासाठी 'आनंदवना'ची निर्मिती केली. आदिवासी व युवक यांना प्रेरणा देण्याचे महान कार्य केले. भारत सरकारने 'पद्मश्री' देऊन त्यांचा गौरव केला. नागपूर व पुणे विद्यापीठांनी डी.लिट. ही सन्मान्य पदवी दिली. 'ज्वाला आणि फुले', 'माती जागवील त्याला मत', 'उज्ज्वल उदयासाठी' ही त्यांची पुस्तके.

झिबिस्को व हरबानसिंग यांच्यात रोमहर्षक लढत झाली. तिची प्रभावी हकीकत या उताऱ्यात कथन केली आहे.

---

**नागपूरच्या** माउंट हॉटेलजवळचे कुस्त्यांचे मैदान माणसांनी नुसते फुलून गेले होते. शौकिनांचे लोंढे बाहेर तुंबले होते. आसपासची झाडेही माणसांनी खच्चून भरली होती. मैदानाच्या मध्यभागी दोरखंडांनी वेढलेल्या रिंगणाकडे सर्वांचे डोळे खिळले होते. ब्रिटिश साम्राज्यातले झाडून सारे नामवंत मल्ल या वेळी दंगलीत उतरले होते. उमद्या मनाचा यहुदी गोल्डस्टिन, पहाडासारखा भासणारा चिडखोर किंगकाँग, जगज्जेता महामल्ल झिबिस्को, वस्तादांचा वस्ताद अर्जुनसिंग आणि संगमरवरी रेखीव स्नायूंचा 'रुस्तुम-ए-हिंद' हरबानसिंग!

त्या दिवशीच्या लढती आटोपल्यानंतर झिबिस्को रिंगणात आला. हत्तीला जखडबंद करणारे साखळदंड त्याने आणले होते. चारी बाजूंना पसरलेल्या माणसांच्या समुद्रावर त्याने एक नजर टाकली आणि खाली टाकलेल्या त्या साखळदंडांपैकी एक साखळदंड त्याने उचलला. त्याला झोके देत तो लाउडस्पीकरपाशी आला आणि ओरडला, ''मी तुमच्यापैकी कोणालाही कुस्तीसाठी आव्हान देतो. आहे कोणी आव्हान स्वीकारायला तयार?''



त्याने मग एक साखळदंड हातात घेतला. त्याच्या बुंध्यासारख्या बाहूंचा एकेक स्नायू टमटमीत फुगला. साखळदंडाची एकेक कडी केविलवाणेपणे उलू लागली. हास्याचा खदखदाट करत त्याने साखळदंडाचे तुकडे बेमुर्वतपणे लोकांच्या अंगावर भिरकावले. प्रेक्षकांची तारांबळ पाहून तो पुन्हा खदखदाट करून हसला.

झिबिस्को साखळदंडामागून साखळदंड तोडत होता. कड्या प्रेक्षकांच्या अंगावर भिरकावत होता. शेवटच्या साखळदंडाच्या कड्या तोडून भिरकावल्यावर तो पुन्हा उन्मत्तपणे गरजला, ''भारतातल्या बुटक्यांनो, तुम्हांला प्रत्येकाला आणि एकाच वेळी सर्वांना माझं आव्हान आहे... आहे कोणी मायेचा पूत लढणारा?''

झिबिस्कोच्या जीवघेण्या पंजाच्या पकडीला जो तो भीत होता. कोणीच पुढे येत नाही असे पाहून झिबिस्कोला आणखीच चेव चढला. भारतीय मल्लांना तो अद्वातद्वा बोलू लागला. एवढ्यात हरबानसिंग चित्त्याप्रमाणे झेप घेऊन पुढे आला. लोक ओरडले, "रुस्तुमे हिंद हरबानसिंग, झिंदाबाद!"

झिबिस्कोच्या जीवघेण्या पकडीची ज्यांना माहिती होती ते हरबानसिंगाला थोपवत होते.

अर्जुनसिंग कळवळून ओरडला, "हरबान, हरबान, तू हे आव्हान स्वीकारलंस तर वाचणार नाहीस."

हरबानसिंग म्हणाला, "मी कदाचित वाचणार नाही; पण देशाची अब्रू तर वाचेल!"

हरबानसिंगची बायको आणि मुलगा जवळ बसले होते. त्यांच्याकडे त्याने कटाक्ष टाकला. तिने त्याच्याकडे पाहिले आणि स्मिताचे एक टपोरे फूल अलगद त्याच्या दिशेने भिरकावले. त्याचा स्वीकार करून व मुलाच्या खांद्यावर थोपटून हरबानसिंग रिंगणाच्या दिशेने झेपावला. त्याच्या प्रत्येक हालचालीत योद्ध्याचा डौल होता. झिबिस्कोला सामोरे जाऊन हरबानसिंग मोठ्या आवाजात गरजला, "खबरदार, जीभ आवर. आमच्या देशाला लांच्छन लावू नकोस!"

झिबिस्को आपल्याच मस्तीत होता. तो म्हणाला, "एकतर मला कंठस्नान घाल किंवा माझे पाय धर." हरबानसिंग म्हणाला, "ठीक आहे, स्वीकारलं तुझं आव्हान!"

तीन आठवड्यांचा काळ मधे होता. हरबानसिंग तयारी करत होता. नामवंत मल्ल त्याला डावपेच शिकवू लागले; पण झिबिस्कोच्या पंजाच्या त्या मरणप्राय पकडीवर कोणाजवळच तोड नव्हती.

हरबानसिंगने सर्व भेटीगाठी बंद केल्या. ठरलेल्या मुकाबल्याची तयारी तो करू लागला. शरीरशास्त्राचा अभ्यास, झिबिस्कोच्या छायाचित्रांचा अभ्यास असा कितीतरी प्रकारचा अभ्यास त्याने चालवला. तो आत्मविश्वासाने सांगायचा, की माझ्या यशाचे रहस्य माझी ताकद नव्हे, माझी शांत वृत्ती आहे.

एक दिवस सकाळीच तो माझ्या घरी आला. म्हणाला, "एक भांडण घेऊन मी आणि कीरतभाभी तुझ्याकडं आलो आहोत. तुला आम्ही दोघांनी पंच म्हणून मान्य केलं आहे."

हरबानसिंग पुढे म्हणाला, " हे पहा, आजची लढत पाहायला तुझ्या कीरतभाभीनं येऊ नये असं मला वाटतं. तू तिला समजाव. आजच्या लढतीत काय होईल ते सांगता येत नाही. आणीबाणीच्या क्षणी तिला समोर पाहून एखाद्या वेळी मी डगमगण्याचा संभव आहे. माझा छोटा मुलगा, लढत पाहताना एखादी किंकाळी फोडील. हरलो तर तुला सांगून ठेवतो, मी आत्महत्या करीन; पण माझी अखेरची इच्छा एकच आहे–माझ्या मुलानं झिबिस्कोच्या पंजाच्या त्या पकडीवर तोड शोधून काढावी."

कीरतभाभी म्हणाली, "कबूल, तुमच्या सर्वोच्च पराक्रमाचे क्षण अनुभवताना मला का अडवता?"

मी फैसला सुनावला, "भाभीला लढत पाहायची परवानगी आहे."

ठरल्या दिवशी पुन्हा तुफान गर्दी जमली. रिंगणात उतरताच हरबानसिंगने सर्वांना अभिवादन केले. त्याने लालभडक रेशमी जांघिया चढवला होता. मालिशवाल्यांनी चटचट थोपटत मालिश उरकले. हरबानसिंगाचे शरीर म्हणजे जणू एक देखणे शिल्प होते! आणि त्याच्यापुढे उभा होता एक अवाढव्य दैत्याकार स्नायूंचा पहाड.

सलामी देताना हरबानसिंग खिलाडू वृत्तीने म्हणाला, "शुभचिंतन मित्रा, शुभचिंतन!"

झिबिस्को त्या उद्‌गारांनी खदखदा हसला. तो म्हणाला, "बच्चा, खुशामत करतोस काय?"

मग पकडीच्या पवित्र्यात दोन्ही हात जरा फाकून तो उभा राहिला. निरनिराळे कोन साधून हरबानसिंग पवित्रे घेत होता. आपल्याला हात नाहीत असे समजून लढत द्यायचा त्याचा इरादा होता. मध्येच एकदा हूल देऊन तो उसळला आणि झिबिस्कोच्या पोटावर त्याने ढुक्कर-मुसंडी घेतली; पण झिबिस्को बेसावध नव्हता. एका पायावर गिरकी घेत तो बाजूला झाला. हरबानसिंगची मुसंडी

तोफेच्या गोळ्यासारखी रिंगणाच्या दोरखंडातून बाहेर गेली. तो गर्दीवर कोसळलाच होता; पण निमिषार्धात स्प्रिंगसारखा तो उभा झाला. विजेसारखा रिंगणाकडे झेपावला; पण झिबिस्कोच्या बाहूंची अभेद्य तटबंदी मधे होती.त्याने दोन्ही हातांची कमान हाणून हरबानसिंगाला बाहेरच्या बाहेर खाली पाडले.

एक.. दोन...तीन.... पाच म्हणण्यापूर्वी विजेसारखा हरबानसिंग उठला आणि मग त्या दोघांत शिवाशिवीचा खेळ सुरू झाला. हरबानसिंग हरतऱ्हेने रिंगणात शिरकाव करून घेण्याच्या प्रयत्नात होता; पण त्याला रिंगणाबाहेर ठेवून झिबिस्कोला तांत्रिक विजय संपादन करायचा होता. तो त्या खटपटीत होता. अरेरे! न लढताच हरबानसिंगाला पराभव पत्करावा लागणार!

घड्याळाचा काटा टिकटिकत पुढे सरकत होता आणि लोकांची उत्कंठा शिगेला पोचली होती. लढत न देताच वेळ संपणार की काय?

कुठल्याही गोष्टींने हरबानसिंग विचलित होत नसे, प्रक्षुब्ध होत नसे. सर्व-जण व्याकूळ झाले होते.

आणि अचानक हर्षध्वनीने सारे आकाश दुमदुमले! हरबानसिंग रिंगणात आला होता. झिबिस्को का कोणास ठाऊक पण डोळे चोळू लागला आणि एक मानवी वीज तळपत खडी राहिली. बघता बघता झिबिस्कोचे धूड एका देशी डावासरशी खाली कोसळले! त्याला खाली दाबून धरत हरबानसिंग पवित्र्यात पाय रोवून बसून राहिला. आकडे मोजून संपेपर्यंत झिबिस्कोला त्याने जमिनीला खिळवून ठेवले. पंचांनी निकाल घोषित केला आणि हरबानसिंगच्या जयघोषाने आकाश दुमदुमले!

एवढ्यात ध्वनिक्षेपकावरून हरबानसिंगाचा रौद्रगंभीर आवाज लोकांच्या कानी आला, "मित्रांनो, हा माझा विजय खरा नव्हे!"

लोक ओरडले, "नाही, नाही, तूच जिंकलंस! रुस्तुमे हिंद हरबानसिंग झिंदाबाद!"

हरबानसिंग पुन्हा गरजला, "मला तांत्रिक कारणासाठी पराभव पत्करण्याची नामुष्की नको होती. लढण्यावाचून हरणे मला नामंजूर होते. झिबिस्को मला मैदानातच येऊ देत नव्हता. तांत्रिक दृष्ट्या ते बरोबर असेल;

पण मर्दानगीला ते शोभलं नसतं! मग एकच मार्ग होता. मैदानातील धूळ उचलून झिबिस्कोच्या डोळ्यांत अलगद झोकली. झिबिस्कोला काय किंवा तुम्हा कोणाला काय, ते समजलंच नव्हतं. मित्रांनो, झिबिस्को हरला, पण मी जिंकलो नाही!'' आणि मग झिबिस्कोकडे नजर टाकून हरबानसिंग म्हणाला, ''पंधरा दिवसांनी आपण पुन्हा कुस्ती करू. माझ्या चुकीचं प्रायश्चित्त म्हणून इनामाच्या रकमेत मी आणखी दहा हजार रुपये माझ्यातर्फे घालतो.''

तो बोलला, ''तुझी ताटी तयार ठेव. आधी तुझा मुडदा पडेल आणि नंतर आकडे मोजले जातील, ध्यानी ठेव.''

हरबानसिंग हसून म्हणाला, ''कोणाची ताटी जायची ते नियतीच ठरवील. आपण कशाला गमजा करायच्या?''

त्यानंतरचे पंधरा दिवस हरबानसिंग विचारमग्न होता. झिबिस्कोची ती वज्रमूठ! तिच्यावर कोणता तोडगा काढावा?

दुसऱ्या लढतीचा दिवस उजाडला. सलामी झडली आणि झिबिस्कोने हरबानच्या हाताचा कब्जा घेतला, सलामीलाच आर्मलॉक! लोक हळहळत होते. झिबिस्को हात आवळत होता आणि शरणागती मागत होता. म्हणत होता, ''बायका-पोरांना याद कर. शरण ये.''

मैदानातला क्षोभ शिगेला पोचू पाहत होता; पण हरबानसिंगने त्याही अवस्थेत लोकांना 'शांत रहा' म्हणून खुणावले. आणि एकाएकी हरबानसिंगाने उड्डाण घेतले. झिबिस्कोच्या भुजेवर आपली सगळी ताकद लावून सिंगलबारवर घेतात तशी त्याने झेप घेतली. झिबिस्कोच्या मानेभोवती हरबानसिंगची कैची बसली. वज्रमूठ सुटली! झिबिस्कोच्या मानेवरून गिरकी घेऊन तो मागे वळला. झिबिस्कोच्या दोन्ही तंगड्या त्याने समोर ओढल्या. तो दैत्याकार स्नायूंचा पहाड लंबाचीत झाला होता!

हरबानसिंग गुडघे टेकून त्याला दाबून ठेवू पाहत होता आणि आकडे-मोजणी संपण्याआधी पाठ टेकू नये म्हणून तिची कमान करण्याचा झिबिस्को प्रयत्न करत होता. हरबानसिंग जेटसारखा उडून झिबिस्कोच्या अंगावर क्षणार्धात कोसळला. झिबिस्कोचे हाड कडाडले आणि तो भुईसपाट झाला.



हरबानसिंगच्या या यशाने सगळे मैदान थैमान घालत होते.

स्ट्रेचर आले. झिबिस्कोचा देह त्यावर ठेवला. हरबानसिंग गुडघे टेकून खाली वाकला. दोन्ही हातांच्या ओंजळीत झिबिस्कोचा चेहरा धरून तो म्हणाला, "मित्रा, मला तुझी ही अवस्था पाहून खेद होतोय रे!"

झिबिस्कोने आपला पराभव मान्य केला. 'रुस्तुमे हिंद हरबानसिंग झिंदाबाद!' या घोषणांनी सगळे मैदान दुमदुमून गेले.

## शब्दार्थ व टिपा :

**जखडबंद**—घट्ट बांधून ठेवलेला. **बेमुर्वत**—बेफिकीर; बेपर्वा. **मायेचा पूत**—खऱ्या आईचा पुत्र; पराक्रमी, प्रतापी पुरुष. **अद्‌वातद्‌वा**—वेडेवाकडे. **मुकाबला**—लढाई. **दैत्याकार**—राक्षसाच्या आकाराचा. **खुशामत**—खूश करण्यासाठी केलेली खोटी स्तुती. **निमिषार्धात**—क्षणार्धात. **मर्दानगी**—शौर्य.

**लांच्छन लावणे**—बदनामी करणे; कलंक लावणे. **हूल देणे**—चकवणे. **कब्जा घेणे**—ताब्यात घेणे. **शिगेला पोचणे**—शेवटच्या टोकाला जाणे. **लंबाचीत होणे**—पराभूत होणे.

**गोल्डस्टिन, किंगकाँग, झिबिस्को**—ही सर्व परदेशी मल्लांची नावे आहेत. **रुस्तुम-ए-हिंद**—भारताचा पराक्रमी मल्ल. ही पदवी हरबानसिंगला दिली होती. 'रुस्तुम' म्हणजे पराक्रमी पुरुष. **आर्मलॉक**—हातांची सहज न सुटणारी मजबूत पकड. **जेट**—विमानाचा एक प्रकार. **स्ट्रेचर**—रुग्ण-शिबिका-हिच्यावर रोग्याला झोपवून एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी नेले जाते.

## प्रश्न :

१. झिबिस्कोला प्रत्येकजण का भीत होता?
२. झिबिस्कोचे आव्हान हरबानसिंगाने का स्वीकारले?
३. हरबानसिंगाने झिबिस्कोशी लढत दयायची म्हणून कोणती तयारी केली?
४. 'हा माझा विजय खरा नव्हे,' असे हरबानसिंग का म्हणाला?
५. पुन्हा केलेल्या कुस्तीत हरबानसिंगाने कशाच्या जोरावर झिबिस्कोचा पराभव केला?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. शिगेला पोचणे, हूल देणे, लांच्छन लावणे, लंबाचीत होणे यांचा वाक्यात उपयोग करा.
२. 'हास्याचा खदखदाट' यासारखे आणखी काही शब्दप्रयोग सांगा.
३. 'स्ट्रेचर' यासारखे मराठीत रुळलेले आणखी काही इंग्रजी शब्द शोधा आणि त्यांचे वहीत टिपण करा.
४. तुम्ही पाहिलेल्या एखादया कुस्तीच्या फडाचे वर्णन वीस-पंचवीस वाक्यांत करा.

* * *



# १७. मौजे शिरकोली

पुणे जिल्ह्यातील मौजे शिरकोली या खेडेगावात ऊर्जानिर्मितीचे अनेक प्रयोग करण्यात आले. आपल्या गावचे प्रश्न आपण सोडवले पाहिजेत, ही प्रेरणा या प्रयोगांतून गावकऱ्यांना कशी मिळाली, ते या पाठात एका गावकऱ्याने सांगितले आहे.

**भारताचं** खरं दर्शन घडतं ते खेड्यांत. मौजे शिरकोली हे असंच एक खेडं अनेक लाखांतील एक. पुण्यापासून तीस किलोमीटर अंतरावर. पुणं शहर कसं माणसांनी गजबजलेलं! पण शिरकोली गावातली वस्ती चार-साडेचारशेच्या आसपास. भारतातील सर्व भागांशी पुणं हे अनेक मार्गांनी जोडलेलं; पण शिरकोली पुण्यापासून तसं तुटलेलं.

मला शिरकोलीला जायचं होतं. खडकवासल्यापर्यंत मोटार-रस्ता आहे. तेथून नावेनंच जावं लागतं. अगदी भल्या पहाटे गावातून दूध पुण्यात येतं ते नावेतून. नाव चालू नसली, की शिरकोलीचा बाहेरच्या जगाशी संबंध तुटतो. दळणवळण होऊ शकेल असं साधनच नाही.

बरं, गावात रस्ते तरी आहेत का? मुळीच नाहीत. आहेत त्या फक्त पायवाटा. त्यांच्या अल्याडपल्याड कशाबशा उभ्या राहिलेल्या झोपड्या. तुम्हांला पाणी प्यायला हवं असेल, तर एक किलोमीटर तरी चालत जावं लागेल आणि पाणी आणावं लागेल.

इथं पाऊस मात्र पडतो धुवाधार. पावसाळ्याच्या तीन महिन्यांत वारेमाप पाऊस पडतो; पण जमिनीतून मिळणारं पीक मात्र बेताचं. भात नाहीतर जाडंभरडं धान्य पिकवावं आणि त्याच्यावर कशीतरी गुजराण करावी,हे इथलं जिणं. तसं हाताला काम नाही. दिवसच्या दिवस आळसात काढायचे. अनेकांच्या मनात यायचं – चांगले दिवस कधी बरं येतील?

असं अंधारात चाचपडत राहणारं आमचं शिरकोली. पोटभर अन्न मिळत नव्हतं. अंगभर कापड मिळत नव्हतं, की चांगला निवारा नव्हता. दिवसामागून दिवस चाललेले. अठरा विश्वे दारिद्रय पाचवीला पुजलेलं. भारतातील बरीचशी खेडी अशीच अंधारात. तिथं ज्ञानाचा प्रकाश नाही त्यामुळं समृद्धी नाही. तिथं फक्त होती उपासमार, अडाणीपणा आणि मागासलेपणा!

डॉ. मोडक म्हणून पुण्याहून एक भला माणूस आला आणि आमच्या गावचा चेहराच पालटू लागला. घरोघरी ते पायी फिरू लागले. त्यांचा आपला एकच ठेका – कामाला लागलं पाहिजे. जो घाम गाळील तो दाम मिळवील. आपलं भाग्य आपल्या हाती.

त्यांनी एक दिवस सभा भरवली आणि आम्हा गावकऱ्यांना विचारलं, "असंच आळसानं जगणार, की काम करून पुढं जाणार?"

आम्ही सर्वांनी ठासून सांगितलं, "काम करणार."

ते म्हणाले, "शाबास! बरं, तुम्ही स्वयंपाकासाठी कोणतं जळण वापरता?"

मी म्हणालो, "हेच की आपलं - लाकूडफाटा, शेणाच्या गोवऱ्या..." ते म्हणाले, "म्हणजे नुसती झाडं तोडत राहता? नवी झाडं काही लावत नाही?"

"ते कशापायी? बख्खळ पाऊस पडतो. रानझुडपं माजतात, ती पुरतात जळणाला."

"असं नाही चालायचं! आता सुबाभुळ लावू या. पाला होईल जनावराला खायला, शिवाय लाकूड मिळेल आणि बिया विकून पैसाही मिळेल. शिवाय चिंच, लिंब अशी आणखी झाडं लावू."

आम्ही लागलो कामाला. गावात लागवडीखाली नसलेली जमीन होती. असेल शंभर एक हेक्टर. स्वयंपाकासाठी जळण हवं होतं. गावात वीज नव्हती. प्यायला पाणी आणायचं म्हणजे नदीवर पंप बसवायला पाहिजे. शेताला पाणी दयायचं म्हणजे पंप पाहिजेच.मुबलक ऊर्जा असती,तर छोटा उद्योगधंदा करता आला असता आणि चार पैसे गाठीला बांधले असते. हे सगळं करायचं तर सर्वांनी काम केलं पाहिजे. योजना आखून खांद्याला खांदा भिडवला पाहिजे.

आम्ही दररोज भेटत होतो. डॉ. मोडक यांच्याबरोबर बोलत होतो. ते एक

दिवस म्हणाले, "तुमच्या गावात कितीतरी नैसर्गिक संपत्ती आहे. लागवडीखाली न आलेली जमीन आहे. पावसाचे महिने सोडले, तर सूर्याची शक्ती मिळू शकते. सुसाट वाऱ्यापासूनही शक्ती मिळू शकेल. प्राण्यांच्या मलमूत्रापासून गोबर गॅस मिळू शकेल..." ते बोलत राहिले. आम्ही लक्ष देऊन ऐकत होतो. माझ्या मनात आलं, एवढी संपत्ती आपल्याजवळ आहे; तरी आपण उगीचच नशिबाला बोल लावत एकेक दिवस ढकलत होतो.

पहिलं काम म्हणजे सुमारे शंभर हेक्टर जमीन मशागत करून लागवडीखाली आणायची. यापैकी ४०-५० हेक्टर जमीन केवळ जळणासाठी लागणाऱ्या लाकूडफाट्यासाठी वापरायची. सुबाभळीची रोपं लावली, की ती झपाट्यानं वाढतात. पाणीही फारसं लागत नाही. शिवाय बांबूची लागवड करून पैसे उभे करता येतील व वेतकामासारखा पैसे देणारा उद्योग सुरू होईल. औषधी वनस्पतींची रोपं लावून फायदा मिळवता येईल. चाऱ्यासाठी गवत मिळालं तर दुधाचं उत्पन्न वाढेल; पण आपल्या पोराबाळांना दूध न देता दूध विकायचं नाही.

मौजे शिरकोली कामाला लागलं. अनेक हात राबू लागले. लहान-थोर, बायका-पुरुष झटू लागले. आपले हात हीच आपली शक्ती–हीच आपली ऊर्जा! रामदासांनी म्हटलंच आहे, 'क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे,'

तसं आमचं गाव लहान; पण जवळजवळ दोनशे तरी गुरंढोरं होती. शिवाय लोकवस्ती साडेचारशेच्या आसपास. छोट्याछोट्या वाड्यांनी मिळून बनलेलं हे गाव! पडवळवाडी, वैतागवाडी, साळकरवाडी, बोरगेवाडी, मधाळेवाडी या सर्व मिळून ६०-६५ कुटुंबं. मग तीन 'गोबर गॅस' सुरू करायचे, 'गाव तिथं गोबरगॅस' अशी घोषणा देण्यापेक्षा प्रत्यक्ष 'गोबरगॅस' टाकी लावायची असं ठरवलं. इच्छा आहे तिथं मार्ग आहेच आहे! या 'गोबरगॅस'चा उपयोग स्वयंपाकासाठी होतो; शिवाय रस्त्यावरचे दिवे जळू शकतात आणि पंपालाही गॅस उपयोगी पडतो.

आम्हांला प्रथम कळलं, की सूर्यापासून ऊर्जा मिळू शकते. सूर्याच्या उष्णतेवर भात, भाजी, वरण शिजू शकतं; पण माझ्या मनात आलं – भाकरीचं

काय? डॉक्टर म्हणाले, "वा! गोबर गॅस आहे की हाताशी!". सूर्याच्या ऊर्जेपासून रेडिओ चालू शकेल, टी.व्ही. चालू शकेल असं डॉक्टर सांगत होते.



तसं आमचं गाव गरीब; मात्र पावसाची आणि वाऱ्याची कृपा आमच्या गावावर भरपूर आहे. डॉक्टर म्हणाले, "हा भणाणणारा वारा बारा किलोमीटर वेगानं वाहतो. आपण पवनचक्की उभी करू. पवनचक्की चालली, की तलावातलं पाणी पंपानं खेचून शेताला देता येईल."

आमच्या गावाला लागणारी ऊर्जा निर्माण करण्याची साधनसंपत्ती आमच्याजवळ पडून होती. तिचा उपयोग करून विकास केला पाहिजे, हे आमच्या कधी लक्षातच आलं नव्हतं. गावाच्या विकासाला काय काय लागतं? अन्नधान्य लागतं, प्यायला पाणी लागतं, शेताला पाणी लागतं... तर मग ऊर्जा निर्माण केली पाहिजे.

मनुष्य विचार करत नाही त्यामुळं कृतीही करत नाही; म्हणून गाव बदलत नाही. आता हे चालायचं नाही.

मौजे शिरकोलीचं रूप येत्या तीन-चार वर्षांत पालटेल. विचार करता करता भविष्याची सोनेरी स्वप्नं माझ्यासमोर तरळू लागली – खडकवासला धरणाला लागून वसलेलं हे गाव, त्याच्या भोवतालचे डोंगर, गच्च भरलेलं बाभुळबन, त्याला लागूनच उभं असलेलं बांबूचं बन, डोलणारी भरघोस पिकं, पवनचक्कीवर चालणारे पंप,घराघरांत शिरलेला गॅस, स्वच्छ रुंद रस्ते, छोटी

शाळा, दवाखाना, रेडिओ, टी.व्ही... एक ना दोन, अनेक गोष्टी दिसू लागल्या आणि कायापालट झालेल्या शिरकोलीचं एक सुंदर चित्र समोर उभं राहिलं.

### शब्दार्थ व टिपा :

**धुवाधार पाऊस**—खूप जोराचा पाऊस. **गुजराण**—निर्वाह; चरितार्थ. **ऊर्जा**—शक्ती.

**अठरा विश्वे दारिद्र्य**—पराकोटीचे दारिद्र्य. **पाचवीला पुजणे**—जन्मापासून सोबत असणे. **चेहरा पालटणे**—रंगरूप बदलणे. **खांद्याला खांदा भिडवणे**—सहकार्याने व एकजुटीने काम करणे. **क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे**—रामदासस्वामींच्या 'मनाचे श्लोक'मधील एक चरण. केवळ बडबड व्यर्थ आहे, त्यापेक्षा कृती हवी, असा आशय.

### प्रश्न :

१. भारताचे खरे दर्शन खेड्यात घडते, असे का म्हटले आहे?
२. डॉ. मोडक यांनी गावकऱ्यांना कशासाठी प्रवृत्त केले?
३. डॉ. मोडक यांनी गावच्या विकासासाठी काय काय करायला हवे, असे सांगितले?
४. ऊर्जा मिळवण्यासाठी खेड्यात कोणकोणते प्रयत्न करता येतात?
५. 'आपले हात हीच आपली शक्ती—आपली ऊर्जा' असे का म्हटले आहे?

### स्वाध्याय व उपक्रम :

१. पाचवीला पुजणे, गुजराण करणे, खांद्याला खांदा भिडवून काम करणे, अठरा विश्वे दारिद्र्य यांचा वाक्यात उपयोग करा.
२. 'जो घाम गाळील तो दाम मिळवील', अशी सुभाषितवजा वाक्ये या पाठात आहेत, ती शोधा आणि ती पट्ट्यांवर लिहून त्या वर्गात लावा.
३. 'आपले हात हेच आपले उज्ज्वल भविष्य' यावर निबंध लिहा.

* * *





# १८. सरोजिनी नायडू

## यदुनाथ थत्ते

**यदुनाथ दत्तात्रय थत्ते** (जन्म : १९२२) समाज प्रबोधनासाठी सेवाभावी वृत्तीने काम करणारे कार्यकर्ते. राष्ट्रीय एकात्मतेसाठी सानेगुरुजींनी स्थापन केलेल्या 'आंतरभारती'चे सचिव. 'साधना' साप्ताहिकाचे माजी संपादक. मुलांसाठी बरीच लहानमोठी पुस्तके लिहिली आहेत. 'आपला मान—आपला अभिमान', 'सोन्या', 'युवाशक्तीला आव्हान', 'जग्गूबाबा' ही त्यांची काही पुस्तके.

'सरोजिनी नायडू' या थोर देशसेविकेचा परिचय या उताऱ्यात त्यांनी करून दिला आहे.

**आधुनिक** भारताच्या स्वातंत्र्य-संग्रामात पुरुषांच्या बरोबरीने स्त्रियाही सहभागी झाल्या होत्या. अशा स्त्रियांच्या अग्रभागी सरोजिनी नायडू शोभून दिसतात.

सरोजिनींचा जन्म १३ फेब्रुवारी, १८७९ रोजी झाला. त्यांचे वडील अघोरनाथ चट्टोपाध्याय.ते हैद्राबादच्या निजाम महाविद्यालयाचे प्राचार्य होते.

व्यासंगी विद्वान आणि समाजसुधारक म्हणून त्यांची ख्याती होती. सरोजिनींच्या आईचे नाव वरदासुंदरी. त्या कवयित्री होत्या.

त्या काळच्या निजामाच्या राज्यात स्त्रियांवर अनेक जाचक बंधने होती. सरोजिनीला त्यांची झळ पोचत नसली, तरी इतरांना होणाऱ्या त्रासाने सरोजिनी बेचैन होई. हे असे का, हा प्रश्न तिच्या डोक्यात घोळत राही.

वयाच्या अवघ्या बाराव्या वर्षी सरोजिनी शालान्त परीक्षा उत्तम प्रकारे उत्तीर्ण झाली. वयाच्या अवघ्या सोळाव्या वर्षी सरोजिनी उच्च शिक्षणासाठी इंग्लंडला रवाना झाली तिच्या आई-वडलांनी तिला प्रोत्साहन दिले. मुलीबद्दल त्यांना विश्वास होता आणि आपल्या गुणांनी ती परदेशातही चमकल्यावाचून राहणार नाही, याची त्यांना खात्री होती.

देश नवा, वातावरण नवे, लोक नवे, त्यांचे रीतीरिवाज नवे; पण सरोजिनी बावरली नाही. सहजपणे लोकांत रमली. तिथल्या स्वातंत्र्याच्या वातावरणात तिच्यातली वक्तृत्व व संभाषणकला बहरून आली आणि तिच्या अंतःकरणातील भावनांना कवित्वाचे धुमारे फुटले. आपल्या काही कविता तिने आपल्या इंग्रजीच्या प्राध्यापकांना दाखवल्या. त्यांनी तिला प्रोत्साहन दिले. या उत्तेजनाने तिची कविता फुलत राहिली.

तरुण सरोजिनीला तिथल्या समाजाचे जे दर्शन झाले, त्यामुळे तिला आपल्या पारतंत्र्याची बोचणी लागली देश परतंत्र असेपर्यंत देशातल्या सर्वांना विकासाची संधी मिळणार नाही, याची तिला खात्री पटली.

इंग्लंडमधून परतल्यावर त्यांचा विवाह डॉ.गोविंदराजुलू नायडू या सुविद्य तरुणाबरोबर झाला.

१९०४ साली हैद्राबाद संस्थानात पुराने थैमान घातले. संसाराची सुखद स्वप्न रंगवण्याचा तो काळ; पण लोकांची दैना सरोजिनींना बघवेना. पूरग्रस्तांच्या मदतीला त्या निर्भयपणे आणि उमाळ्याने धावून गेल्या. अशा रीतीने त्यांच्या सार्वजनिक जीवनाचा श्रीगणेशा झाला.

या सर्व धावपळीत त्या कविता लिहीतच राहिल्या. त्यांचा पहिला इंग्रजी कवितासंग्रह १९०५ साली प्रसिद्ध झाला. 'सोनेरी उंबरा' असे त्यांच्या

कवितासंग्रहाचे नाव. तो खूप गाजला. 'भारताची बुलबुल' असे लोकांनी त्यांना म्हणायला सुरुवात केली.

१९०६ साली कलकत्त्याला सामाजिक परिषद भरली होती. स्त्री-शिक्षणा-बद्दलचा ठराव सरोजिनींनी मांडला. त्या ठरावावर त्यांचे अत्यंत प्रभावी असे भाषण झाले. एका पुरुषाचे शिक्षण म्हणजे एका व्यक्तीचे शिक्षण; पण एका स्त्रीचे शिक्षण म्हणजे अवघ्या कुटुंबाचे शिक्षण असते, यावर त्यांनी भर दिला. भारतसेवक गोपाळ कृष्ण गोखले यांनी सरोजिनींना शाबासकी दिली. ते म्हणाले, "देशासाठी जीवन वाहा." गोखल्यांच्या या शब्दांप्रमाणेच त्यांचे सौजन्य, देशहिताची त्यांची तळमळ यांचा सरोजिनींवर प्रभाव पडला. देशहितासाठी त्यांनी मनोमन स्वतःला वाहून घेतले.

घर, संसार, सार्वजनिक कार्य, कविता-लेखन यांत त्या मग्न झाल्या. १९१२ मध्ये त्यांचा दुसरा इंग्रजी काव्यसंग्रह 'काळपक्षी' या नावाने प्रसिद्‌ध झाला. तोही गाजला.

१९१४ साली गांधीजींशी त्यांची ओळख झाली आणि त्या त्यांच्या कुटुंबातल्याच एक बनल्या. त्यांचे नर्म विनोद आणि कोट्या यामुळे गंभीर वातावरणातही प्रसन्नतेचा शिडकावा होई. सरोजिनीबाईंना गांधीजींच्या साधेपणातले सौंदर्य भावले. 'स्वराज्य म्हणजे अंत्योदय', ही जाणीव त्यांच्या मनावर ठसली. नटण्यामुरडण्याची त्यांची हौस संपली.

मॅंटिग्यू समितीपुढे त्यांनी स्त्रियांना समान मताधिकार देण्याची जोरदार मागणी केली. १९१८ साली महायुद्‌ध संपले. ब्रिटिशांनी भारताला कृतज्ञता म्हणून काही देण्याऐवजी दडपशाही सुरू केली. त्याविरुद्‌ध देशात चळवळीचे तुफान उठले. सरोजिनी त्या चळवळीत अग्रभागी राहिल्या. एवढेच नव्हे, तर इंग्लंडमध्ये जाऊन त्यांनी ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या सैतानी लीलांचा पाढा वाचला. ब्रिटिश सरकारने दिलेला 'कैसर-इ-हिंद' हा किताब त्यांनी निषेध म्हणून परत केला. त्यांच्याबद्दल लोकमान्य टिळक म्हणाले होते, 'सरोजिनी म्हणजे दुर्दम्य उत्साह, नेत्रदीपक बुद्‌धिवैभव आणि भारून टाकणारे कर्तृत्व.'

सरोजिनींची गणना अखिल भारतीय नेत्यांत होऊ लागली. त्यामुळे हैद्राबाद

संस्थानात प्रवेश करायला त्यांना निजाम सरकारने बंदी घातली. सरोजिनीदेवींनी मुंबई हे आपले कार्यक्षेत्र बनवले. १९२५ साली कानपूरला भरलेल्या काँग्रेसच्या अधिवेशनाच्या अध्यक्षपदी त्यांची निवड झाली. त्या म्हणाल्या,



'ग्रामीण गरीब आणि शहरी श्रमिक यांच्यापर्यंत स्वातंत्र्याची फळे आपल्याला पोचवायची आहेत. अस्पृश्यतेसारख्या दुष्ट रूढींना गाडल्यावाचून ऐक्य कोठले? जात-धर्म-वंश-भाषा इत्यादी भेदांना दाद न देणारे अखिल भारतीय नागरिकत्व आपण जोपासले पाहिजे.'

१९२८ साली त्या अमेरिकेला गेल्या. तेथे त्यांनी भारतीय स्वातंत्र्य आणि वर्णभेदरहित मानवी समता यांचा पुरस्कार केला. त्या मायदेशी परतल्या तेव्हा सत्याग्रहाची तयारी सुरू होती. दांडी सत्याग्रहाच्या वेळी त्या हजर होत्या आणि धारासना येथील सत्याग्रहाचे त्यांनी नेतृत्व केले. त्यांना कारावासाची सजा झाली. त्यानंतरचा काळ प्रचंड घडामोडींचा व लढ्यांचा होता. त्यात सरोजिनी सतत सामील झाल्या होत्या. 'चले जाव' लढ्यात गांधीजींबरोबर आगाखान पॅलेसमध्ये त्यांनी शिक्षा भोगली.

भारतीय घटना समितीच्या त्या सन्माननीय सभासद होत्या. १५ ऑगस्ट, १९४७ ला देश स्वतंत्र झाला. आकाशवाणीवर त्यांचे अतिशय हृदयंगम भाषण झाले. त्या म्हणाल्या, 'भारताचा स्वातंत्र्यलढा हे एक महाकाव्यच आहे. कित्येकांनी त्यासाठी दिव्य केलं. स्वातंत्र्यलढ्याचा इतिहास किती नाट्यपूर्ण घटनांनी भरलेला आहे! भारतीय नारी रणरागिणी बनल्या होत्या. तरुणांनी लढ्याचं तेजस्वीपणं नेतृत्व केलं... भारताचा जणू पुनर्जन्म होत होता! किती सुरम्य आहे हा देश! उत्तरेला त्यानं हिमकिरीट धारण केला आहे आणि सागर त्याचं पादप्रक्षालन जणू करतो आहे. भारत सर्वांच्या स्वागताला सदैव सज्ज असेल. विश्वासानं या. प्रेमानं या. भारत सर्व प्रकारच्या दास्यांचा दुष्मन आहे. त्याला भव्यदिव्य भूतकाळ आहे, तसाच उज्ज्वल भविष्यकाळही आहे!'

देशातल्या सर्वांत मोठ्या अशा उत्तर प्रदेशाचे राज्यपालपद त्यांच्याकडे आले. एक स्त्री राज्यपाल झाली, हा देशातील सामाजिक क्रांतीचा एक महत्त्वाचा टप्पा होता. राज्यपाल म्हणून त्यांनी राजभवनाची वेगळीच घडी बसवली. साधेपणात सौंदर्य आणि समतेत शिष्टाचार साधतो, हे त्यांनी दाखवून दिले.

३ मार्च, १९४९ रोजी वयाची सत्तरी ओलांडताना त्यांचे निधन झाले. भारतीय स्वातंत्र्यासाठी निरंतर धडपडणारा एक जीव निमाला.

## शब्दार्थ व टिपा :

**धुमारे** –अंकुर. **नर्म** –हलकेफुलके. **अन्त्योदय** –तळागाळातील गरिबांचे हित व त्यांचा विकास. **दुर्दम्य** –काबूत आणण्यास कठीण; ओसंडणारा. **हिमकिरीट** –बर्फाचा मुकुट. **पादप्रक्षालन** –पाय धुणे.

**पाढा वाचणे** –(गाऱ्हाण्यांचा) तपशील सांगणे.

**मॉंटेग्यू समिती** –भारताच्या राज्यकारभारात सुधारणा सुचवण्यासाठी ब्रिटिश सरकारने नेमलेली समिती. मॉंटेग्यू त्या समितीचे प्रमुख होते. **दांडी सत्याग्रह** –ब्रिटिश सरकारने भारतीयांवर लादलेला मिठावरील कर रद्द करण्यासाठी इ.स. १९३० मध्ये गुजरातेतील दांडी या गावी गांधीजींनी केलेला सत्याग्रह.

## प्रश्न :

१. परदेशातील स्वातंत्र्याच्या वातावरणाचा सरोजिनी नायडू यांच्यावर कोणता परिणाम झाला?
२. त्यांना सार्वजनिक कार्याची प्रेरणा कशातून मिळाली?
३. 'स्त्रीचे शिक्षण म्हणजे अवघ्या कुटुंबाचे शिक्षण असते,' असे सरोजिनी नायडूंनी का म्हटले?
४. 'कैसर-इ-हिंद' हा किताब ब्रिटिश सरकारला परत करण्यामागे सरोजिनी नायडू यांची कोणती भूमिका असावी?
५. ना. गोखले व लोकमान्य टिळक यांनी त्यांच्याविषयी कोणते उद्‌गार काढले?
६. सरोजिनी नायडू यांच्या व्यक्तिमत्त्वातील वैशिष्ट्यांचे थोडक्यात वर्णन करा.

## स्वाध्याय व उपक्रम :

१. 'इतिहास'पासून 'ऐतिहासिक' हा शब्द तयार होतो. बुद्‌धी, वंश, भूगोल, समाज या शब्दांपासून अशा प्रकारे कोणते शब्द तयार करता येतील?
२. नेताजी सुभाषचंद्र बोस यांच्या आझाद हिंद सेनेत कॅप्टन लक्ष्मी यांनी महत्त्वाची कामगिरी बजावली. त्यांचे चरित्र मिळवा व ते वाचा.
३. सरोजिनी नायडू यांनी ज्या सत्याग्रहांत व लढ्यांत भाग घेतला, त्यांची माहिती गोळा करा.

★ ★ ★



# १९. अंगणवाडी

**अनुताई वाघ**

**अनुताई वाघ** (जन्म : १९१०; मृत्यू : १९९२) बालकल्याण आणि आदिवासी कल्याण या दोन क्षेत्रांत निरपेक्ष सेवा. कोसबाडच्या ग्राम-बाल-शिक्षा-केंद्राच्या प्रमुख. बालकल्याण कार्यासाठी भारत सरकारने राष्ट्रीय पारितोषिक देऊन त्यांचा गौरव केला. 'टिल्लूची करामत', 'गंमत जंमत', 'कुरण शाळा', 'बडबडगीते' इत्यादी बालसाहित्य.

हा उतारा 'कोसबाडच्या टेकडीवरून' या आत्मचरित्रातून घेतला आहे. आदिवासींच्या मुलांना 'बालवाडी'त आणण्यासाठी त्यांनी कोणते प्रयत्न केले व त्यांना काय काय अनुभव आले, ते या पाठात कथन केले आहेत.

---

**गावातील** मुलांना बालवाडीत आणण्याचे प्रयत्न आम्ही करत होतो. त्याच वेळी गावाबाहेर राहणाऱ्या आदिवासींची मुलेपण बालवाडीत आणण्याचे प्रयत्न चालू होते. आदिवासी बंधुभगिनी गावात लाकडाचे भारे विकणे, पाने विकणे अगर कोणाकडे काही मज़ुरी करणे अशा कामांसाठी येत असत. पाणी पिण्यासाठी म्हणून ही मंडळी बालवाडीत येत. त्या वेळी लहान मुलांचे खेळ मोठ्या कौतुकाने पाहत.

'तुमची मुलंपण बालवाडीत पाठवा ना...', असे म्हटले तर, 'क्या-ना' (का नाही?) असे म्हणत. पण मुले यायची मात्र नाहीत. शेवटी आम्हीच त्यांच्या अंगणात जायचे ठरवले. ही आमची 'अंगणवाडी'.

वस्तीच्या मध्यभागी एखादे झाड शोधायचे. त्याच्या खालची जागा स्वच्छ करायची. तेथे मुलांना जमवून गाणी, गोष्टी, खेळ, रंगकाम, काडीवरचे विणकाम वगैरे कार्यक्रम व्हायचे.

आमची पहिली अंगणवाडी 'हल्लपत निवास' ही होय. हे नाव आम्हीच पाडले होते. पहिल्या दिवशी मुले आम्हांला भिऊन पळून गेली. घरात मोठी

माणसे कोणीच नव्हती. दुसऱ्या दिवशीही असाच शुकशुकाट होता; पण किलकिल्या दाराआडून काही डोळे चमकत होते. नंतर आम्ही ओवण्यासाठी म्हणून वाटीमध्ये मणी व दोरा आणला. त्या वाट्या दाराबाहेर ठेवून आम्ही बाजूला झालो. सगळ्या वाट्या आत गेल्या व थोड्या वेळाने ओवलेल्या माळांसह बाहेर आल्या. हळूहळू मुलांची-आमची मैत्री वाढली. मुले आमची वाट पाहू लागली.

येथेही मुलांना स्वच्छ करणे हे पहिले काम होते. शिवाय पाणी लांबून आणावे लागायचे. उन्हाळ्यात तर जेमतेम पिण्यापुरते पाणी मिळायचे. तेव्हा 'रोज अंघोळ करा, कपडे धुवा,' वगैरे सांगून उपयोग काय?

रोज अंगणवाडीस जाताना बादलीत आरसा, फण्या, तेल, रुमाल, झांजा व इतर हस्तव्यवसायाचे सामान,खांद्यावर खराटे, पंखाझाडू अशा थाटात आम्ही निघत असू. ओल्या रुमालाने मुलांची अंगे पुसून घ्यायची. पहिल्यापहिल्याने तर एका मुलासाठी एक रुमाल वापरावा लागे. कारण त्याचे अंग पुसतानाच तो काळाकुट्ट होऊन जाई. मधूनमधून मुलांना जवळपासच्या वाडीतील विहिरीवर नेऊन अंघोळी घालण्याचा कार्यक्रम होत असे. कडू लिंबाच्या पाल्याचे खरजेवरचे औषध तेथेच आम्हांला सापडले.

आईवडील कामानिमित्त बाहेर गेलेले. जराशी मोठी मुलेही कोठेतरी वाडीत विटांच्या भट्टीवर चार-दोन आणे रोजावर गेलेली. मग आठ-दहा वर्षे वयाच्या मुलांनी घर आणि लहान भावंडे सांभाळायची. घर ते काय सांभाळायचे? कुडाच्या भिंती, दोन गाडगी-मडकी, पितळेचे भांडे कोठेतरी आढळेल, एखादे जुने लुगडे – त्या झोळीत लहान मूल झोपायचे. मोठ्यांना निजायला असल्या तर चटया, नाहीतर जमीन. पांघरायला पाहिजेच असे नाही. मुलगे लंगोटी लावलेले, तर मुलींच्या कमरेला नावापुरत्या चिंध्या गुंडाळलेल्या. बाकी सर्व उघडेच. लक्तरे झालेले सदरे. पुरुषांच्याही लंगोट्या व लांब कुडती. बायकांची नऊवारी लुगडी खरी,पण ती फाटलेली. अशा घरात सांभाळायचे ते काय? लहान भावंडे आणि कोंबड्या. एखाददुसरे कोकरू.

ही सर्वच मंडळी आमच्या अंगणवाडीत येत असत. मोठी भावंडे, त्यांच्या

कडेवर तान्ही बाळे व बोटाशी-पाठीशी बाळे अशा थाटाने ही मंडळी आमच्या अंगणवाडीत यायची. आम्ही मोठ्या मुलांचे खेळ, कवाईत, हस्तव्यवसाय घेत असू. तान्ह्यांना तरटावर ठेवून खेळवायचे व बालवाडी गटास गाणी, गोष्टी, खेळ, हस्तव्यवसाय शिकवायचा.

आदिवासींची ही मुले नागरी संस्कृतीपासून दूर होती; पण निरागस होती. डोळ्यांत चमक. चपळपणा व काटकपणा हे गुण लक्ष वेधून घेणारे होते. झाडावर सरसर चढणे, उतरणे त्यांच्या हातचा मळ. जनावरांच्या शेपट्या पिरगळून त्यांच्या मागे धावायची. म्हणून मी एक सूत्र केले होते - 'भीत नाही वाघाला, भीत नाही सिंहाला, भितो एका पांढऱ्या कपड्याला.' आमच्या-सारख्या शिकलेल्या माणसांची त्यांना भीती वाटायची.

ही मुले फार विनोदी होती. एकदा ती बोरे खात होती. मी म्हटलं,

"कुठून रे आणलीत?"

"मोळामधे (जंगलात) **बक्कळ आहेत.**"

"मग मला घेऊन चला ना.'

पोरे खो खो हसायला लागली.

"का रे हसता?"

"तू कशी यायची?"

"का बरं?"

"लांब आहे. रस्ता चांगला नाही."

असे मला समजावण्याचा मुलांनी प्रयत्न केला. पण 'मी येणारच,' असे म्हटले तेव्हा दुसऱ्या दिवशी सकाळी आम्ही या सहलीला निघालो. बरोबर बोरे ठेवण्यासाठी छोट्या टोपल्यापण घेतल्या होत्या.

मुले भराभर पळत, उड्या मारत चालली होती. जंगलातल्या वाटेतून मी त्यांच्या गतीने चालू शकत नव्हते. मध्येच मुले कोणीच दिसेनात. मी घाबरले. "ए, कुठं गेलात? मंगळ्या, वनशा, शुक्री–" अशा हाका मारायला सुरुवात केली. तर 'हा, हा, हा' करत एका झुडपामागून पुढे आली. ताईची कशी गंमत केली, याचा आनंद त्यांच्या चेहऱ्यावर झळकत होता.



अंगणवाडीतील चित्रकाम फार रंगले होते. अंगण, भोवतालच्या झोपड्यांच्या भिंती तर चित्रित झाल्याच होत्या; पण आसपासच्या वृक्षांचे बुंधेही चित्रांनी भरले होते. हे बुंधे प्रथम शेणामातीने सारवून घेतले जायचे. सुशोभनाची अशीच मजा होती. परिसरातील पाने, फुले, बिया वगैरेंचा उपयोग करून सुशोभन करायचे, हा दंडक होता. एकदा एका भगिनीने शेणाचा पो उचलून आणला. त्याला व्यवस्थित आकार दिला. त्यावर रंग शिंपडले. भोवती फुले लावली. एका भगिनीने माती व शिंपा यांची दीपमाळ केली.

आम्ही अंगणवाडीत जात असू,तेव्हा रस्त्यात काही मुले लहानशा पहारीने खणून काहीतरी शोधताना दिसत. 'काय शोधता रे?' असे विचारले म्हणजे 'गुंदल्या' , असे उत्तर येई. 'गुंदल्या' म्हणजे एक प्रकारच्या गवताची मुळे. ती खणून काढून ही मुले आपले पोट भरत असत. साधारण फेब्रुवारी ते जूनपर्यंत या मुलांना असेच रानोमाळ भटकून खाद्य शोधावे लागते. झाडावरची करवंदे, सीताफळे, बोरे, कैऱ्या, जांभळे, आवळे, चिंचा आणि रानटी फळे कच्चीच खायची. ती पिकून तयार होईपर्यंत धीर कुठला?खाद्य शोधण्यासाठी वणवण भटकायचे, तरीही अपुरेच पडायचे. अंगावर कपडा नाही, राहायला झोपडी

जेमतेम. अशा अवस्थेतील या मुलांनी शाळेत यावे, पाच तास बांधल्या भिंतींच्या आत बसावे व पुस्तकी ज्ञान घोकावे अशी अपेक्षा तरी कोणत्या तोंडाने करायची? पोटात कावळे काव काव करत असताना निरर्थक घोकंपट्टी कोणाला सुचेल?

पण अशा अवस्थेतही ही मुले सदैव आनंदी दिसत असत. यापेक्षा वेगळे जीवन जगायचे असते, याचे त्यांना भानच नव्हते. हेच कदाचित या आनंदाचे कारण असू शकेल.

**शब्दार्थ व टिपा :**

**खरोटे**—खराटे. **लक्तरे झालेले**—ठिकठिकाणी फाटलेले. **बक्कळ**—पुष्कळ. **पो**—शेणाचा (छोटा) ढीग. **शिंपा**—मोठा शिंपला.

**प्रश्न :**

१. आदिवासी मुलांशी मैत्री व्हावी म्हणून लेखिकेने कोणती युक्ती केली?
२. 'अंगणवाडी'त आदिवासी मुले का येत नसत?
३. आदिवासी मुलांविषयी लेखिकेने कोणत्या भावना व्यक्त केल्या आहेत?
४. आदिवासींची कोणती दुःखे लेखिकेला जाणवतात?
५. गरिबी असूनही आदिवासी मुले का आनंदी दिसत?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. या पाठात आदिवासींच्या घराचे वर्णन केले आहे. तुम्ही राहत असलेल्या घराचे वर्णन तुमच्या शब्दांत लिहा.
२. 'अनुताई वाघ' यांच्या कोसबाड येथील अंगणवाडीला शक्य झाल्यास भेट द्या.
३. तुमच्या वर्गाचे सुशोभन करण्यासाठी काय काय कराल, त्याची योजना करा.

* * *



# २०. आगळा पाहुणचार

## पु. ल. देशपांडे

**पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे** (जन्मः १९१९) विनोदी लेखक व नाटककार. 'खोगीरभरती', 'नस्ती उठाठेव', 'बटाट्याची चाळ', 'असा मी, असा मी' इत्यादी विनोदी पुस्तके. 'अंमलदार','तुझे आहे तुजपाशी', 'ती फुलराणी' इत्यादी नाटके. 'व्यक्ती आणि वल्ली', 'गणगोत' इत्यादी व्यक्तिचित्रांची पुस्तके. 'अपूर्वाई', 'पूर्वरंग', 'जावे त्याच्या देशा' इत्यादी प्रवासवर्णने.

हा उतारा 'अपूर्वाई' या प्रवासवर्णनातून घेतला आहे. जर्मनीतील क्रेफेल्ड या छोट्या शहरात वावरताना जे अनुभव आले, ते लेखकाने आपल्या खेळकर शैलीत इथे कथन केले आहेत.

---

**पॅरिसमध्ये** एक रात्र मुक्काम करून लगेच आम्ही आगगाडीनं जर्मनीतल्या क्रेफेल्ड शहरी जायला निघालो. क्रेफेल्ड शहरात आम्ही प्रवेश केला. हे शहर एके काळी युद्धात संपूर्ण जमीनदोस्त झालं होतं, या घटनेवर आमचा विश्वासच बसेना!

एका कुटुंबानं चालवलेल्या एका खाजगी हॉटेलात आम्ही उतरलो. एका प्रसन्न चेहऱ्याच्या म्हातारीनं आमचं स्वागत केलं आणि घटकाभरात सारं कुटुंब आमच्याभोवती जमलं. जर्मन माणूस हा कमालीचा कुटुंबवत्सल आहे. या कुटुंबात वावरताना आम्हांला अगदी भारतात असल्यासारखं वाटलं. जर्मन माणसाचं अगत्य भलतंच अपूर्व वाटलं. वास्तविक पाहिलं, तर हे हॉटेल. परंतु 'काय हवं, काय नको ' हे काळजीनं पाहण्याची रीत जिव्हाळ्याची होती.

क्रेफेल्ड शहर टुमदार आहे. तिथून डुसलडॉर्फ हे सात-आठ किलोमीटर असेल. डुसलडॉर्फ हे एक प्रचंड मोठं शहर आहे. ऱ्हाईन नदी शहरामधून वाहते. तिथल्या एका म्युझियममध्ये आम्ही एक सुंदर चित्रकला-प्रदर्शन पाहिलं. महायुद्धातील बॉम्बहल्ल्यात या म्युझियमची अर्ध्याहून अधिक

पडझड झाली होती; पण उद्ध्वस्त झालेल्या शहरांतून आता नवी शहरं उठली आहेत. पुन्हा जिद्दीनं उभ्या राहणाऱ्या जर्मनांचा देश पाहून आदर दुणावतो.

जर्मन माणसं राब राब राबली. पराजयाची नामुष्की डोक्यावर घेऊनही जर्मन माणसं त्यातून वर आली. आज आपल्याला दिसतो तो 'नवा जर्मनी'. जर्मन माणूस राबणारा जबर; पण तो रुक्ष नाही. अतिशय रसिक आहे. संगीताचं त्याला वेड आहे. शेकडो वादकांचे ताफे पुन्हा उभे राहिले आहेत. घरोघरी टेलिव्हिजन गेला आहे. कारखाने सुरू आहेत. नवा नवा माल भरून वाहतो आहे. बाजारपेठांत जर्मनीचं नाव गाजतं आहे. आपत्तीशी जिद्दीनं झुंजत झुंजत जर्मनी चांगला सुस्थित होऊन उभा आहे.

एका कुटुंबात जेवायला गेलो. फ्रांझ आणि त्याची पत्नी इल्मा अतिशय प्रेमळ. या कुटुंबात आमची अनेक जर्मन मंडळींची ओळख झाली. फ्रांझ हा उत्तम फोटोग्राफर. त्याचे रंगीत फोटो पाहण्यात रात्र कशी गेली ते कळले नाही. इथे सात-आठ दिवस आम्ही अत्यंत आनंदात काढले.

नव्या वर्षाचं स्वागत आम्ही जर्मनीत केलं. एकतीस डिसेंबरला हे लोक सिल्व्हेस्टर साजरा करतात — म्हणजे रात्री बारा वाजता फटाके लावून, दिवे उजळून, नाचगाण्यात रात्र जागवून नव्या वर्षाचं स्वागत करतात.

केगेल हा जर्मन लोकांचा आवडता खेळ. आपल्या छोट्या मुद्गलासारख्या जोड्या उभ्या करून एका जड चेंडूनं त्या नेमक्या पाडायच्या! एकूण आठ-दहा जोडपी होती. हॉटेलात वर नृत्यगायनाला ऊत आला होता. तळघरात आम्ही दंगा चालवला होता. त्या तळघरानं कदाचित प्रथमच मराठी गाणी ऐकली असतील. तेवढ्यात फ्रांझ आत गेला. क्षणार्धात हिटलरसारख्या मिशा लावून व कपाळावर केस ओढून आला आणि त्यानं हिटलरची नक्कल केली. त्याखेरीज अनेक खेळ झाले. फटाके उडाले. इतक्यात क्रेफेल्डमधल्या साऱ्या चर्चमधून बाराच्या ठोक्याला घंटा निनादल्या आणि त्यानंतरच्या दृश्यानं मात्र मी गहिवरलो. आमच्यातल्या वृद्ध जोडप्यांनी आपल्या मुलांना आणि सुनांना पोटाशी धरलं आणि 'चिरंजीव व्हा' अशा अर्थाचा जर्मन भाषेत आशीर्वाद दिला.



आम्ही सगळेजण रस्त्यात धावत आलो. आकाशात नक्षत्रांशी स्पर्धा करणारं दारूकाम सुरू होतं. आमच्या मित्रमंडळींनीदेखील ही सामग्री आणली होती. सारा रस्ता गजबजला होता. तरुणतरुणीच काय, पण सत्तरीतले म्हातारे आणि म्हाताऱ्या मुक्त आनंदानं नाचून नव्या वर्षाचं स्वागत करत होत्या. खाण्यापिण्यात आणि नाचण्यात नव्या वर्षाची पहाट फुटली.

नव्या वर्षाचा तो सिल्व्हेस्टर साजरा करताना सहज चाळा म्हणून आमच्या सौभाग्यवतीनं तांबड्या टिकल्या, लिपस्टिक वगैरेंच्या साहाय्यानं तिथं जमलेल्या साऱ्या जर्मन बायकांच्या कपाळाला कुंकू लावलं. फ्रांझच्या म्हाताऱ्या आईला तर चांगलं ठसठशीत कुंकू लावलं आणि आमच्या सौंदर्य-दृष्टीला त्या गौरांगना अधिकच सुंदर दिसायला लागल्या.

नव्या वर्षाची ती पहिली पहाट! रात्र जागवून सारं क्रेफेल्ड झोपलं होतं. आम्ही आमच्या बॅगा घेऊन स्टेशनच्या दिशेनं निघालो होतो. पाय जड झाले होते. डोळेही जड झाले होते आणि अंतःकरणही! दुसऱ्या महायुद्धात याच जर्मन लोकांच्या मनात केवढा द्वेष खदखदत होता आणि तीच जर्मन मंडळी आज आम्हांला भरल्या डोळ्यांनी सांगत होती, "पुन्हा या, पुन्हा या – लवकर या."

आम्ही त्यांना सांगत होतो, "आमच्या देशात या – ताज पाहा, गंगा पाहा - अजंठा-एलोरा पाहा..."

एक मात्र सांगायचं राहिलं – फ्रांझच्या घरी भिंतीवर मेणबत्त्या ठेवायचा स्टँड होता. माझ्या पत्नीनं त्या चिमुकल्या पितळी स्टँडचं कौतुक करून तो कुठं मिळतो अशी चौकशी केली होती. फ्रांझच्या घरचं जेवण आटपून निघताना इल्मानं गुपचूप एक बॉक्स माझ्या पत्नीजवळ दिला.

त्यात तो स्टँड होता!

एका म्हाताऱ्या फळवालीच्या दुकानात फळे घेतली. तिचे पैसे दिले. आम्ही बाहेर पडलो. ती म्हातारी 'थांबा' म्हणाली आणि तिनं पुढं होऊन पत्नीला चॉकलेट दिलं.



"हे काय?" असं विचारताच ती म्हणाली, "आपल्या गावात ही मुलगी पाहुणी म्हणून आलीय ना! तिला हे छोटसं बक्षीस..."

या चिमण्या क्रेफेल्ड गावानं आणि त्या जर्मन मंडळींनी आमच्या मनात कुठंतरी घर केलं खरं!

## शब्दार्थ व टिपा :

**म्युझियम**—वस्तुसंग्रहालय. **दुणावणे**—दुप्पट होणे. **मुद्गल**—लाकडी जोडी. ही हाताने फिरवून व्यायाम करतात. **गौरांगना** —गोऱ्या स्त्रिया.

**ऊत येणे**—अतिरेक होणे. **मनात घर करणे**—मनात कायमचे राहणे; विशेष जिव्हाळा निर्माण होणे.

**हिटलर**—दुसऱ्या जागतिक महायुद्धाला कारणीभूत झालेला जर्मनीचा हुकुमशहा. **दुसरे महायुद्ध**—१९३९ ते १९४५ या कालावधीत झालेले जागतिक महायुद्ध. याच युद्धात अणुबाँबचा प्रथम वापर केला गेला आणि हिरोशिमा व नागासाकी ही शहरे बेचिराख झाली. लाखो लोक प्राणास मुकले. एकूण सर्व जगावरच त्याचे भयंकर परिणाम झाले.

## प्रश्न :

१. जर्मनांचा देश पाहून लेखकाचा आदर का दुणावला?
२. जर्मन लोक नव्या वर्षाचे स्वागत कशा रीतीने करतात?
३. जर्मन लोकांच्या पाहुणचाराचा लेखकाला कोणता अनुभव आला?
४. 'जर्मन मंडळींनी आमच्या मनात कुठंतरी घर केलं', असे लेखकाने का म्हटले आहे?
५. या पाठाच्या आधारे जर्मन लोकांची स्वभाववैशिष्ट्ये सांगा.

## स्वाध्याय व उपक्रम :

१. तुम्हांला आवडणाऱ्या एखाद्या सणाचे वर्णन करा.
२. जमीनदोस्त होणे, मनात घर करणे, ऊत येणे, पडझड होणे यांचा उपयोग करून वाक्ये तयार करा.
३. चर्च, म्युझियम, टेलिव्हिजन, बॉक्स या इंग्रजी शब्दांना मराठी प्रतिशब्द सांगा.
४. भारतातील दुसऱ्या एका राज्याचा मुलगा तुमच्या कुटुंबात पाहुणा म्हणून आला, तर त्याचे आदरातिथ्य करण्यासाठी कोणते कार्यक्रम योजाल?



# २१. जुलेखा

**वि. वा. शिरवाडकर**

**विष्णू वामन शिरवाडकर** (जन्म : १९१२) कवी, नाटककार, कादंबरीकार.

'कुसुमाग्रज' या टोपणनावाने कवितालेखन. 'विशाखा', 'किनारा', 'मराठी माती' इत्यादी कवितासंग्रह. 'कौंतेय', 'दुसरा पेशवा', 'नटसम्राट' इत्यादी नाटके. 'जान्हवी', 'वैष्णव', 'कल्पनेच्या तीरावर' या कादंबऱ्या. याशिवाय इतरही ललितलेखन.

पुणे विद्यापीठाने त्यांच्या वाङ्मयीन कर्तृत्वाबद्दल त्यांना 'डी.लिट.' ही सर्वोच्च पदवी देऊन आणि शासनाने 'राम गणेश गडकरी' पुरस्कार देऊन त्यांचा गौरव केला.

हा उतारा त्यांच्या 'वीज म्हणाली धरतीला' या ऐतिहासिक नाटकातून घेतला आहे.

---

[स्थळ - काल्पी. १८५८ मार्च. वेळ - सकाळची.
रावसाहेब पेशवे यांचा मुक्काम असलेला वाडा.
दिवाणखान्यात रावसाहेब कोचावर बसलेले आहेत. जवळच्या खुर्चीवर तात्या टोपे. दोघेही काही कागदपत्र पाहत आहेत. दोघांचेही वय तिशीच्या आतबाहेर असून रावसाहेब पेशव्यांनी मराठेशाही पद्धतीचा व टोप्यांनी देशी पद्धतीचा लष्करी पोशाख परिधान केलेला आहे. हुकमाची वाट पाहत एक पहारेकरी दाराजवळ उभा आहे.]

**रावसाहेब** : घेऊन ये तिला इकडं.

[पहारेकरी जातो.]

**टोपे** : जनरल रोजच्या फौजा झाशीवर इतक्या लवकर उतरतील असं वाटलं नव्हतं.

**रावसाहेब** : [स्मित करत] पण मला आश्चर्य वाटतं, की मनूनं एक मुलगी आपल्याकडं रवाना केली.

**टोपे** : झाशीच्या राजवाड्यात गेल्यापासून तिच्यात खूप बदल झाला आहे, रावसाहेब.

रावसाहेब : ब्रम्हावर्तातील मनू राहिली नाही ती आता. ब्रम्हावर्तातदेखील ती काही कमी नव्हती. चूलबोळक्यांपेक्षा तलवार-बंदुकांचे खेळच अधिक आवडायचे तिला.

[पहारेकरी आत येतो. त्याच्यामागोमाग जुलेखा येते. लष्करी स्वाराचा वेश धारण केलेली. वेश मळलेला आहे. चेहरा शिणलेला आहे. जुलेखा मुजरा करून उभी राहते. निःसंकोचपणाने पेशव्यांच्या चर्येकडे पाहते. पहारेकरी जातो.]

रावसाहेब : तू राणीसाहेबांकडून आलीस?

जुलेखा : जी, सरकार.

रावसाहेब : अशी जोखमीची कामं राणीसाहेब स्त्रियांकडं केव्हापासून सोपवायला लागल्या?

जुलेखा : माझ्यासारख्या स्त्रिया त्यांना मिळायला लागल्यापासून, सरकार.

रावसाहेब : अस्सं! जबान जोरदार दिसते आहे तुझी!

जुलेखा : नुसतीच जबान नाही, सरकार.

टोपे : तू एकटी आलीस?

जुलेखा : नाही, सरकार हुजरातीचे तीन स्वार बरोबर आहेत माझ्या.

रावसाहेब : [कागद पाहत] तुझं नाव जुलेखा?

जुलेखा : जी,सरकार.

टोपे : झाशीला वेढा बसून किती दिवस झाले?

जुलेखा : आज सहावा दिवस आहे.

रावसाहेब : केव्हा निघालीस तू?

जुलेखा : काल रात्री, सरकार.

रावसाहेब : वेढ्यात गवसली नाहीस?

जुलेखा : शहरातील एक पाणभुयार जंगलापर्यंत गेलं आहे, सरकार. त्या भुयारातून आम्ही बाहेर पडलो आणि नंतर घोडे मिळवून इथपर्यंत आलो.

रावसाहेब : काल्पीला पूर्वी आली होतीस?

जुलेखा : जी हां. अनेकदा. म्हणूनच राणीसाहेबांनी या कामावर माझी नेमणूक केली.

रावसाहेब : तुझा हुद्दा कोणता?

जुलेखा : मी जमादाराचं काम करते सरकारी तोफखान्यात.

रावसाहेब : तू आपल्या हातानं तोफा डागतेस? भीती वाटत नाही तुला?

जुलेखा : भीतीचा गाव फार मागं राहिला आहे, सरकार.

रावसाहेब : राणीसाहेबांना माझे धन्यवाद कळव.

जुलेखा : कशाबद्दल, सरकार?

रावसाहेब : अशी लढाऊ स्त्री तयार केल्याबद्दल.

जुलेखा : माझ्यासारख्या शंभर स्त्रिया किल्ल्याच्या तटावर उभ्या आहेत, सरकार.

रावसाहेब : मग शतशः धन्यवाद कळव! माणसं तयार करण्याची ही किमया आम्हांलाही इतकी साधली नाही.



जुलेखा : माझी कल्पना आहे सरकार, राणीसाहेबांना आपले धन्यवाद नको आहेत, आपली कुमक हवी आहे आणि तीही ताबडतोब.

टोपे : [स्मित करत] वाहवा!

जुलेखा : कशाबद्दल?

टोपे : एकदम समेवर चाळ मारावा तसं बोललीस तू.

जुलेखा : सरकार, हे कोण आहेत?

रावसाहेब : यांना ओळखत नाहीस तू?

जुलेखा : नाही, पण सारखे माझ्याकडं टक लावून पाहताहेत मघापासून.

रावसाहेब : तुझा गैरसमज होतो आहे, जुलेखा. माणसं आम्हांला पारखून घ्यावी लागतात.

टोपे : रावसाहेब, मी हिच्याकडं पाहत होतो हे खरं आहे. हिचा चेहरा मी झाशीमध्ये कुठंतरी पाहिलेला आहे. सहजगत्या विसर पडेल असा चेहरा नाही हा. हीच निर्भय मुद्रा आणि हीच जहांबाज भाषा... आठवलं मला,रावसाहेब. ही झाशीतील एक नामांकित नर्तिका आणि गायिका आहे. होय, तीच. लालाभाऊंच्या वाड्यावर हिच्या नाचगाण्याचा जलसा मी बघितलेला आहे. खरं आहे ना,जुलेखा?

जुलेखा : होय महाराज, खरं आहे. आपण कोण आहात हेही आता माझ्या लक्षात आलं. तात्या टोपे. खरं म्हणजे आपण आल्याची बातमी कळली म्हणूनच त्या दिवशी बक्षींकडच्या उत्सवात मी हजेरी लावली. माफ करा; पण तेव्हा आपला पेहराव वेगळा होता आणि चेहऱ्यावर ही दाढीही नव्हती.

टोपे : [हसून] तेव्हा मी फक्त पेशव्यांचा एक मुतालीक होतो, जुलेखा. आता बंडवाल्यांचा एक नेता झालो आहे.

रावसाहेब : हा एक शुभ योग म्हणायला हवा,तात्या. कित्येक दिवसांत चांगला नाच आपण पाहिलेला नाही. झाशीला जाण्यापूर्वी या नामांकित नर्तिकेनं आपली कला आम्हांला आणि आमच्या

सरदारांना आज दाखवावी.आज बांद्याचे नबाब आणि दतियाचे दिवाणही येथे आलेले आहेत. सगळेजण संतुष्ट होतील. तू तयार आहेस ना, जुलेखा?

जुलेखा : आपण हुकूम कराल तर मी तयार आहे, सरकार, पण नाच नर्तिकेचा होणार नाही. तोफखान्यात काम करणाऱ्या जमादाराचा होईल. चुकून वेडेवाकडे पाय पडले आणि कुणाच्या पगडीला अथवा शिरपेचाला लाथ लागली तर राग मानू नये, एवढीच विनंती आहे.

टोपे : श्रीमंतांनी केवळ थट्टा केली तुझी, जुलेखा. तू राणीसाहेबांची प्रतिनिधी म्हणून आली आहेस. तुला अशा गोष्टीत अडकवण्याचा विचारही आमच्या मनात यायचा नाही. तुझी परीक्षा पाहण्यासाठी साहेब असं बोलले.

जुलेखा : [संशयाने] माझी परीक्षा पाहण्यासाठी?

टोपे : हो. जुन्या पेशात तुझं मन गुंतलेलं आहे की काय, हे पाहण्यासाठी.

जुलेखा : [ओरडते] माझी परीक्षा? [हाताने तोंड दाबून धरते] माफ करा, सरकार. मला असं ओरडायला होतं अधूनमधून. मला सांगायचं होतं इतकंच, की माझी परीक्षा पाहण्याचा अधिकार फक्त राणीसाहेबांनाच आहे आणि हा अधिकार नुसती प्रश्नांची सरबत्ती करणारांना मिळत नाही. जे अगोदर परीक्षा देतात त्यांनाच मिळतो तो.

रावसाहेब : [उठून स्मित करत] तात्या, ही पोरगी आपला शब्द जमिनीवर पडू देत नाही. मनूनं आपल्या अंतःकरणातील प्रखर तेजाचं वाटप भोवतालच्या लोकांना उत्तम केलेलं दिसतं. झाशीला गेल्यापासून मनूच्या बोलण्याचालण्यात काय फरक पडला आहे, देव जाणे! कपाळाचं कुंकू गेल्यापासून तर तिच्यावर आभाळच कोसळलं आहे. पण गंगेच्या घाटावर आमच्या

बरोबर खेळणारी मनू मला अद्याप आठवते आहे. विजेचे पंख लावूनच वावरायची ती. ठीक आहे... जुलेखा, मी खरोखरच थट्टेनं बोललो नाचाबद्दल. तू जा आणि विश्रांती घे. एका घटकेच्या आत मी तुला उत्तराचा खलिता देतो. दिवस कलायच्या आत तुला झाशीला परत निघता येईल.

**जुलेखा** आपली फौज केव्हा निघणार? राणीसाहेबांनी खलिल्यात काय लिहिलं आहे मला माहीत नाही; पण झाशीमधील परिस्थिती फार निकराची आहे, सरकार. माणसं तयार आहेत; पण साधनं फार कमी आहेत. इंग्रजांकडच्या तोफा घडीभरही उसंत घेऊ देत नाहीत. तटावर आणि शहरामध्ये दिवसरात्र आगीची बरसात होते आहे. किल्ल्याच्या कोटावरून गावात पाहिलं, तर नजर फाटून जाईल असे देखावे दिसतात. मोठमोठ्या इमारती गंजिफांच्या घरासारख्या कोसळून पडतात. विहिरी आणि टाक्या फुटून रस्त्यावर पाण्याचे लोट वाहत असतात. तेल-तुपाच्या वखारी पेटून सारं आकाश ज्वालांनी भरून जातं. निराधार, भयभीत लोकांच्या झुंडी पेठेपेठेतून सैरावैरा धावत असतात. संपत्तीचा आणि जीवांचा संहार किती चालू आहे याचा तर हिशेबच नाही. या प्रलयामध्ये माझी महालक्ष्मी, कोसळतं आकाश हातांवर अडवून पहाडासारखी उभी आहे! धड झोप नाही, धड जेवण नाही. सारख्या घोड्यावर स्वार असतात. गोळ्यांच्या वर्षावात सारा कोट पायाखाली घालतात आणि गोलंदाजांना साहाय्य व सूचना करतात. कुठं तटाला खिंडार पडलं, की कामगारांबरोबर स्वतः काम करून ते बुजवून घेतात. पेठेत जाऊन लोकांना दिलासा देतात. फौजेत जाऊन स्वतःच्या हातानं शिपायांना भाकरी वाटतात. दुःखितांची आसवं पुसतात आणि बंदुकीच्या फैरी झाडत हल्ले परतवणाऱ्या सैनिकांत स्वतः सामील होतात. मातीनं माया दिली आणि आकाशानं तेज

दिलं... त्या मिलाफातून ही मूर्ती उभी राहिली आहे, असं वाटतं... पण हे कुठवर चालणार? कुठवर चालणार? अंतः-करणात जिद्द आहे नक्षत्रांनाही हस्तगत करणारी... मनगटात पराक्रम आहे पर्वतांचाही भेद करणारा... पण सरकार, या साऱ्या गोष्टींना शेवट असतो. आपली कुमक वेळेवर पोचली नाही तर... [कल्पनेनेच भयभीत आणि विव्हळ होते.] सरकार,बाप मेल्यावर मी पोरकी झाले... उपासतापास काढले... मोलमजुरी केली... धिक्काराचे आणि अपमानाचे गंज डोक्यावर घेतले... शेवटी नाचघरात जाऊन स्वतःच्याच पायांवर उभी राहिले; पण हे सगळं करत असताना कोणाच्याही पायाला मी लाचारीनं कधी हात लावला नाही. काळीज भरून पाय धरले ते फक्त राणीसाहेबांचे; पण आज तो सारा अभिमान बाजूला टाकून आपल्या पायांवर डोकं ठेवते आणि विनंती करते, की माझ्या राणीला वाचवा... माझ्या राणीला वाचवा...

**रावसाहेब** [तिला उठवत] ऊठ,जुलेखा ऊठ. दोन दिवसांच्याआत आमच्या फौजा झाशीकडं रवाना होतील.



## शब्दार्थ व टिपा :

**जोखमीचे काम**—जीव धोक्यात घालून करायचे जबाबदारीचे काम. **जबान**—जीभ; वाणी. **हुजरात**—राजाचे किंवा राणीचे खास नोकर. **कुमक**—मदत (सैन्य, पैसा इत्यादींची). **सम**—तालाची पहिली टाळी; तालाच्या आरंभीची मुख्य जागा. **जहांबाज**—धाडसी; रोखठोक. **मुतालीक**—कारभारी; उपमंत्री. **गंज**—ढीग; रास.

**शब्द जमिनीवर पडू न देणे**—उत्तरास लगेच प्रत्युत्तर देणे. **नजर फाटणे**—भीषण किंवा अद्‌भुत दृश्य पाहून स्तिमित होणे.

**काल्पी**—उत्तरप्रदेश राज्यातील एक ऐतिहासिक गाव. **रावसाहेब पेशवे**—दुसऱ्या बाजीरावाचा दत्तकपुत्र. **तात्या टोपे**—इंग्रजांविरुद्‌धच्या १८५७ च्या उठावातील एक प्रमुख सेनानी. **जनरल रोज**—इंग्रज सैन्याचा सेनापती. **मनू**—झाशीच्या राणी लक्ष्मीबाई यांचे लहानपणचे नाव. **ब्रम्हावर्त**—उत्तरप्रदेश राज्यातील गंगानदीच्या तीरावरील एक तीर्थक्षेत्र. रावसाहेब पेशवे, राणी लक्ष्मीबाई, तात्या टोपे यांचा बालपणचा काळ येथे गेला होता. **गंजिफा**—दशावतारांची चित्रे असलेले खेळायचे गोल पत्ते; या पत्त्यांचा खेळ.

## प्रश्न :

१. 'ब्रम्हावर्तातील मनू आता राहिली नाही', असे रावसाहेब पेशवे का म्हणतात?
२. कोणत्या गोष्टीबद्‌दल राणीसाहेबांना धन्यवाद कळवायला रावसाहेबांनी सांगितले?
३. एकदम समेवर चाळ मारावा तसे जुलेखा बोलली, असे तात्या टोपे यांना का वाटले?
४. जुलेखाची परीक्षा पाहण्यासाठी रावसाहेबांनी काय केले? तिच्यावर त्याचा काय परिणाम झाला?
५. 'कोसळते आकाश हातांवर अडवून आपली राणी उभी आहे', असे जुलेखा का म्हणते?
६. जुलेखाने आपला सारा अभिमान कशासाठी बाजूला टाकला?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. पाठाच्या आधारे झाशीच्या राणीचे वर्णन करणारी दहा वाक्ये लिहा.
२. 'भीतीचा गाव फार मागं राहिला आहे', 'मातीनं माया दिली आणि आकाशानं तेज दिलं' यांसारखी अनेक सुंदर वाक्ये या पाठात आली आहेत. ती शोधा व वहीत लिहा.
३. हा नाट्यप्रवेश प्रयोगरूपाने करून दाखवा.

★ ★ ★



# २२. स्नेही

**गो. वि. करंदीकर**

**गोविंद विनायक करंदीकर** (जन्म : १९१८) कवी, ललितनिबंधकार, टीकाकार.

'विंदा करंदीकर' या नावाने कवितालेखन. 'स्वेदगंगा', 'मृद्गंध', 'ध्रुपद', 'जातक' इत्यादी कवितासंग्रह. 'स्पर्शाची पालवी', 'आकाशाचा अर्थ' हे ललितलेखसंग्रह. 'सशाचे कान', 'राणीचा बाग', 'एटू लोकांचा देश' इत्यादी बालगीतसंग्रह.

हा पाठ त्यांच्या 'स्पर्शाची पालवी' या पुस्तकातून निवडला आहे. कोकणातील आपल्या घरी पैसे वसूल करण्यासाठी स्नेही येतात, ही घटना एका लहान मुलाच्या दृष्टिकोनातून लेखकाने सांगितली आहे.

---

**'स्नेही'** दक्षिणेकडून येतात. ते आठवलीतल्या आंब्याजवळ आल्याबरोबर दादा त्यांना ओळखू शकतात. मग ते आईला म्हणतात, ''सिधुकाका आणि काही स्नेही येताहेतसं दिसतं. बहुतेक वस्तीला राहावेत... येई-येईतोच काळोख पडेल.''

मग दादा धार काढण्यासाठी गोठ्यात जातात. मी आईला विचारतो, ''आई, स्नेही म्हणजे कोण ग्ये?''

आई म्हणते, ''स्नेही म्हणजे मित्र.''

माझा धाकटा भाऊ बापू 'स्नेही, स्नेही,' असं मोठमोठ्यानं हेल काढून ओरडू लागतो. आई म्हणते, ''बाप्या, आता तोंडाची वटवट जरा कमी कर.''

बाप्या जरा वेळ थांबून आईला पुन्हा प्रश्न विचारतो, ''आई, स्नेह्यांना शेंडी असते का ग्ये?''

पण आई भराभरा खळ्याचा केर काढत असते आणि आम्ही पसरलेल्या माडाच्या पात्या पुंजावत राहते. तिचं आमच्याकडं लक्ष नसतं. मी खळ्याच्या कोपऱ्यावर उभा राहून 'स्नेही' कसे येतात ते पाहत असतो.

हळूहळू ते तिमनमळ्यापर्यंत येऊन पोचतात.आम्टांव्याजवळ आल्यावर मीसुद्धा त्यांतील दोघांना ओळखू शकतो. रुमाल बांधलेले उंच ते सिधुकाका. लुटुकलुटुक चालणारे ठेंगे ते नानुभटजी. तिसरे स्नेही मात्र पूर्वी आमच्याकडं कधीच आलेले आठवत नाहीत.

हुश्य हुश्य करत स्नेही घरात शिरतात. त्यांची पायताणं मातीनं लाल झालेली असतात. सदरे घामानं भिजलेले असतात. दादा त्यांना 'या-बसा' करतात. आई पडवीच्या पावठणीवर एका पितळी बशीतून बराचसा गूळ आणि पाण्याचं एक तांब्याभांडं आणून ठेवते. त्या तिसऱ्या स्नेह्यांना दादा 'अण्णामास्तर' म्हणतात.

अण्णामास्तर नुकतेच मुंबईहून पेन्शन घेऊन आलेले असतात. ते अगदी हळू व सावकाश बोलतात. मला त्यांचं बोलणं मिळमिळीत वाटतं. ते ओळख नसताना विनाकारण मला 'बाळ, बाळ' करतात. हसरासा चेहरा करून



विनाकारण काहीतरी विचारत बसतात. 'नंबर' विचारतात. मला असले प्रश्न आवडत नाहीत; पण तरीही ते बोलू लागले, की मला गंमत वाटते. त्यांचा एक दात सोन्याचा आहे. तो मधेच लुकलुक करतो.

थोड्या वेळानं चहाच्या कपबशा पावठणीवर ठेवून आई आत जाते. तिच्याकडं सागव्यातली आत्ते आलेली असते. दादा स्नेह्यांना चहाचे कप देतात. नाक फुटलेला कप आपणासाठी ठेवतात. "अरे, थोडा आणखी घे–" असं म्हणत आपल्या कपातला चहा सिधुकाकांच्या कपात ओतू लागतात. ते 'नको नको' करतात. "अरे, तुम्ही येण्यापूर्वी आत्ता इतक्यात मी घेतला," असं म्हणून दादा अण्णामास्तरांना आग्रह करतात. तेही 'नको नको' करतात.

दादांनी इतक्यात चहा घेतलेला नसतो, हे आम्हांला ठाऊक असतं. आम्ही मुळी आज चहाच केलेला नसतो. मी बापूकडं पाहतो. त्यालाही ते उमगलेलं असतं. तो काहीतरी बोलण्याच्या विचारात असतो; पण आवरतं घेतो.



सिधुकाका म्हणतात, "चहा अगदी फक्कड आहे! ही पावडर कुठून आणलीस?"

बापू 'शेजारून' असं सांगण्याच्या विचारात असतो; पण आवरतं घेतो. त्याला आईनं गप्प राहा म्हणून सांगितलेलं असतं. नानुभटजी म्हणतात, "सगळं दुधावर आहे. घरचं दूध."

सगळे स्नेही चहा भुरुकभुरुक करून पितात. आमच्या तोंडाचा आवाज झाला म्हणजे मात्र दादा आम्हांला ओरडल्याशिवाय राहत नाहीत. सिधुकाकांच्या झुबकेदार मिशा बशीत बुडतात. ते आईला सांगण्यासाठी मी आणि बापू हळूच उठून घरात जातो. प्रथम माजघरात थांबून आम्ही दोघेही ओक्साबोक्शी हसून घेतो. हसण्याचे हुंदके आवरल्यावर मग स्वैपाकघरात आईकडं जातो. तिथं सागव्यातली आत्ते पितळीतून चहा पीत असते. तीसुद्धा भुरुकभुरुक असा आवाज करते. ती आईला म्हणत असते, "आता तुम्ही माझं ऐका. एक सत्यनारायण बोलून बघा."

सागव्याची आत्ते मला मुळीच आवडत नाही. तिच्या हनुवटीवर एक मोठा चांबखीळ आहे आणि त्यावर पांढऱ्या केसांचा झुबका आहे. शिवाय ती आपल्या कलमांच्या बागेविषयी खूप खूप बोलते. साटं पाठवीन म्हणते आणि प्रत्यक्ष कधीच पाठवत नाही. आम्हांला पाहून त्या बोलायच्या थांबतात. मग सिधुकाकांच्या मिशा बशीत कशा बुडतात, ते मी आईला नाकाखाली बोटं घेऊन दाखवतो. आईला हसायला येतं; पण आत्ते 'गाढवा' म्हणून अंगावर खेकसते. मग आईसुद्धा हसत नाही. नेहमी हसणं आवरण्याचा प्रयत्न करते.

इतक्यात पडवीमधून खडाजंगी आवाज ऐकायला येतो, म्हणून आम्ही परत पडवीत येतो व पावठणीवर बसतो. सिंधुकाका आणि दादा खूप जोरानं तणतणत असतात. दोघांचेही चेहरे उग्र झालेले असतात. दोघेही हातवारे करत असतात. मला ते भांडण वाटतं, माझी छाती धडधडू लागते. इतक्यात सगळेजण एकदम खिंकाळल्यासारखे हसू लागतात. या भांडणाला स्नेही 'चर्चा' म्हणतात. चर्चेत 'मुद्दे' असतात. दादा सिधुकाकांचा मुद्दा खोडून काढतात, म्हणून मला बरं वाटतं. आईला चर्चा ऐकणं फार आवडतं. तीसुद्धा



माजघराच्या दाराशी येऊन उभी राहते; पण माझी छाती मात्र उगाच धडधडत असते.

स्नेही आले, की आमची जेवणं अगोदर उरकून घेतात. मोठी पंगत मागाहून बसते. बापूला मोठ्या पंगतीबरोबर बसायला हवं असतं. म्हणून तो हट्ट करतो, तरी आई त्याला दामटून अगोदरच बसवते. मग तो जेवत नाही, तरी त्याला घास कोंबून कोंबून भरवते. मी आपला मुकाट्यानं जेवायला लागतो. आई मला 'शहाणा' म्हणते. स्नेही आले,की शहाण्यासारखं वागावं लागतं. मला स्नेही कसं जेवतात ते बघायचं असतं. मोठी पंगत जेवत असली म्हणजे ते बघण्यातही मला मजा वाटते.

स्नेही भुरकं मारून जेवू लागतात. त्या सगळ्यांची तोंडं वाजत असतात. ती मला पावठणीवरसुद्‌धा ऐकू येतात. स्नेह्यांना जेवतानासुद्‌धा खूप घाम येतो.

जेवल्यानंतर पडवीतल्या झोपाळ्यावर बसून दादा आणि सिधुकाका काहीतरी हळूहळू आणि गंभीरपणं बोलत असतात. सिधुकाका म्हणतात, ''बरं, तो पहिला व्यवहार राहू दे; पण निदान नंतर काढलेली रक्कम तरी...

दादा म्हणतात, "मी शिकस्तीचे प्रयत्न चालवलेले आहेत. सध्या जमिनीला गिऱ्हाईक नाही. आजचं उद्या होईल एवढंच."

सिधुकाका म्हणतात, "ते काय हवं ते कर; पण दिवाळीच्या पलीकडं थांबणं मला अशक्य आहे. प्रत्येकाला त्याचे व्यवहार आहेत. स्नेहाखातर इतके दिवस थांबलो. तुलाही हे समजलं पाहिजे."

झोपण्यापूर्वी पत्त्यांच्या खेळाचा बेत असतो. लवकरच सगळी मांडामांड होते. जुनं जाजम पडवीमध्ये पसरलं जातं. एका बाजूला उपडी पायली ठेवतात व दुसऱ्या बाजूला उपडा कुडव ठेवतात. मग त्यावर दोन कंदील ठेवून खेळाला सुरुवात होते.

अण्णामास्तर आपल्या खिशातून मुंबईहून आणलेला करकरीत नवा जोड जाजमावर आपटतात. सिधुकाका त्यातला 'जोकर' काढून तो माझ्या हातात देतात. त्या जोकरची टोपी संकासुरासारखी मोठी गमतीची वाटते.

माझं लक्ष फक्त दादांच्या हातांतील पानांकडं असतं. दादांच्या हातात एक मोठ्ठा इस्पिकचा एक्क्या असतो. तो एक्क्या पडेपर्यंत तरी मला हा डाव पाहायचा असतो; पण मला झोप आवरत नाही. मी तिथंच जाजमावर दादांच्या पाठीशी आडवा होतो...




स्वप्नामध्ये दादांच्या हातातील इस्पिकचा एक्क्या आणि माझ्या हातातील जोकर यांची लढाई होते. मी ती थांबवण्याचा प्रयत्न करतो; पण ते माझं ऐकत

नाहीत... आणि अचानक दोघेही एकदम माझ्यावरच उलटतात... तेव्हा त्या धसक्यानं मी जागा होतो. त्या वेळी फटफटीत उजाडलेलं असतं आणि स्नेही अगोदरच गेलेले असतात. का ते कळत नाही, म्हणून मी गुपचूप उठून खळ्याच्या कोपऱ्यावर जातो व स्नेही गेले त्या दिशेकडं पाहत राहतो.

## शब्दार्थ व टिपा :

**खळे**—अंगण. **पुंजावणे**—गोळा करणे. **आम्टांबा**—ज्याचे आंबे पिकले तरी आंबटच राहतात असे आंब्याचे झाड. **पावठणी**—पायरी. **ओक्साबोक्शी हसणे**—हेल काढून अनावरपणे हसणे. **हसण्याचे हुंदके**— हसण्याचे स्फोट. **साटे**—आंबा, फणस इ. ची पोळी. **पायली, कुडव**—धान्य मोजण्याची मापे.

**संकासुर**—एक राक्षस. कोकणात शिमग्याच्या सणात त्याचे सोंग काढतात. तेव्हा त्याच्या डोक्यावर शिखरासारखी वर निमुळती होत गेलेली टोपी घातलेली असते.

## प्रश्न :

१. अण्णामास्तरांची वैशिष्ट्ये कोणती?
२. बोलायचे मनात असूनहि बापू आवरते का घेतो?
३. सागव्याची आत्ते लेखकाला का आवडत नाही?
४. या कथेतील मुलाला कोणते स्वप्न पडते?
५. स्नेह्यांचा पाहुणचार करणाऱ्या या कुटुंबाची परिस्थिती गरिबीची आहे, हे कोण-कोणत्या गोष्टींतून दिसून येते?
६. पाठ वाचताना कोठे कोठे हसू येते?
७. या पाठाला आणखी कोणते शीर्षक देता येईल?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. पाठातील प्रसंग कोकणातील वातावरणात घडतात, हे ज्या शब्दांतून विशेष जाणवते ते शोधा व त्यांचे टिपण करा.
२. तुमच्या घरी पाहुणे आल्यावर घडलेले काही प्रसंग आठवून ते लिहा. * * *



# २३. अशी वाढते भाषा

**श्री. म. माटे**

**श्रीपाद महादेव माटे** (जन्म :१८८६ ; मृत्यू : १९५७) विचारवंत, कथालेखक, निबंधकार. अस्पृश्यांच्या प्रश्नांसंबंधी जाणीव ठेवून त्यांच्या उद्धारासाठी झटणारे समाजसेवक.

'उपेक्षितांचे अंतरंग', 'माणुसकीचा गहिवर' इत्यादी कथासंग्रह. 'विज्ञानबोधाची प्रस्तावना', 'अस्पृष्टांचा प्रश्न', 'विचारशलाका', 'संत, पंत, तंत' इत्यादी वैचारिक ग्रंथ. 'चित्रपट' हे आत्मचरित्र व विविध विषयांवरील लेखन.

हा उतारा त्यांच्या 'साहित्यधारा' या लेखसंग्रहातून घेतला आहे. निरनिराळ्या धंद्यातील व व्यवसायांतील लोकांच्या विशिष्ट शब्दप्रयोगांतून भाषा कशी वाढत जाते, याचे विवेचन या लेखात वाचा.

---

**भाषा** वाढते म्हणजे तिच्यातील शब्द वाढतात. वेगवेगळ्या अनुभवांतून, तसेच निरनिराळ्या व्यवसायांतील उपकरणे व अवजारे यांच्या वापरातून शब्दांची वाढ होत असते.

**एखाद्या** माणसाने पंधरा मिनिटांच्या बोलीने एखादा हेलकरी केला पण मुक्कामाचे घर लवकर सापडले नाही; म्हणून त्याने त्या हेलकऱ्याला पाऊणतास तेवढ्याच मजुरीवर रखडवले, तर आपल्या या पराक्रमाचे फुशारकीने वर्णन करताना तो माणूस म्हणतो, ''मी त्या हेलकऱ्याला तसंच पुढं ताणत नेलं.'' रबराचा तुकडा एक बोटभर लांब असला आणि एरवी मोजून पाहिले तर त्याची लांबी तितकीच भरते; पण तेच रबर ताणले तर हातभर लांब होते. अर्थात एवढी लांबी होताना रबराला क्लेश पडतात हे सहज दिसून येते. 'ताणणे' या शब्दाचा हा अर्थ आहे. हेलकऱ्याची जी पंधरा मिनिटे मुळात ठरली होती, ती 'ताणून' पंचेचाळीस केली आणि तसे करताना त्याच्या शरीरक्लेशाकडे लक्ष दिले नाही, हा सगळा अर्थ या बोलण्यात आला आहे.



आपण पुष्कळदा 'हडकणे' हा शब्द 'वाळणे' या अर्थाने वापरतो. वाळून वाळून फक्त हाडे उरणे म्हणजे 'हडकणे' हा मूळचा अर्थ आहे; पण तो नाहीसा होऊन त्याला अगदी साध्या शब्दाचे रूप आले आहे. अमुक कारणासाठी हरताळ पडला, असे आपण हजारदा वाचतो. माणसे पूर्वी पोथ्या लिहीत असत. लिहून झालेले एखादे अक्षर नको असले, तर त्याच्यावर हरताळीची पिवळी पूड फासण्याची चाल असे. ती फासली म्हणजे जरी ते अक्षर थोडेबहुत दिसत असले, तरी ते खोडलेले आहे असे समजायचे, असा संकेत रूढ होता. त्याप्रमाणे अमुक एका आपत्तीमुळे व्यवहार बंद ठेवायचा असला, तर दुकाने बंद ठेवून किंवा थोडी किलकिली ठेवून आपला उद्वेग व्यक्त करत आहो या अर्थी, प्रथम कोणी हौशी रसिकाने तो शब्द योजला पण पुढे पुढे त्यातील मूळचा अर्थ लोप पावून 'हरताळ पाळणे' म्हणजे 'व्यवहार बंद ठेवणे' असा अर्थ रूढ झाला आणि 'हरताळ' हा एक नवाच शब्द बनून राहिला.

नगराकडे धाब्याची घरे असतात. वीज पडणे किंवा दुसरा कसलातरी उत्पात होणे याने जर वस्ती हादरली तर घरावरचे हे धाबे अर्थातच दणकणार. हा प्रकार लक्षात ठेवणाऱ्या कोणी रसिकाने आपत्तीमुळे घाबरून गेलेल्या माणसाचे वर्णन करताना म्हटले, की त्याचे धाबे दणाणून गेले. ते ऐकून तेव्हाचे श्रोते खरोखरच संतुष्ट झाले असतील. 'धाबे दणाणणे' या शब्दांचा मूळ अर्थ

पुढे मावळला आणि 'फार भिणे, घाबरगुंडी उडणे' हा नवाच अर्थ त्याला प्राप्त झाला आणि तो लोकप्रियही झाला.

आता जर आपल्या मराठी भाषेत शब्दांचा अधिक भरणा व्हायला हवा असेल, तर निरनिराळ्या पेशांतील, धंद्यातील अनुभव भाषेत प्रकट व्हायला हवेत. त्यासाठी त्या त्या पेशातील, धंद्यातील माणसे वाङ्मय-लेखनाच्या प्रांगणात उतरायला हवीत.

आपण 'इंगा फिरणे' हा शब्दप्रयोग करतो. कातडे मूळचे खडबडीत असते. ते एका बाजूने पायात धरून व दुसऱ्या बाजूने हातात धरून आपल्या दुसऱ्या हातातील लोखंडाचा इंगा चांभार त्याच्यावरून जोराने फिरवतो. असे त्याने एकदोनदा केले म्हणजे ते कातडे अगदी मऊ होते. हा अर्थ ध्यानात आला म्हणजे 'मोठे खाड खाड बोलतआहेत; पण एकदा साहेबाचा इंगा फिरला की नरम होतील', या उद्‌गारातील खरी खुमारी ध्यानात येईल. 'काकासाहेब ठिय्या देऊन बसले होते, ते हालेचनात.' या वाक्यातील 'ठिय्या' शब्द आपण सुतारखान्यातून उचललेला आहे. पायाखाली धरून जर एखादी फळी रंधायची असली, तर ती पुढे निसटू नये म्हणून पुष्टिपत्रासारखे जे मोठे लाकूड खाली ठेवलेले असते त्याला एक आडवी पट्टी सुतारलोक ठोकतात आणि तिच्या अटणीला ही रंधायची फळी लावतात. ही जी आडवी ठोकलेली लहानशी पट्टी असते,तिला 'ठिय्या' असे म्हणतात. ती जशी हालत नाही, तसे काकासाहेबही हालत नाहीत, असा याचा अर्थ आहे. अशा प्रकारचे अनेक



शब्द आपण वेगवेगळ्या धंदेवाइकांकडून उचललेले आहेत हे खरे; पण खुद्द धंदेवालेच जेव्हा वाङ्मय-लेखनात उतरतील तेव्हा अशा शब्दांची भरती झपाट्याने होईल.

एखादा गवंडी जर लेखन-व्यवसायात पडला आणि त्याला 'विचारांची पातळी पुरेशी वर गेलेली नाही', असे म्हणायचे असेल तर कदाचित तो म्हणेल, की विचारांची कमान जितकी उंच व्हायला हवी तितकी झालेली नाही. परीट लिहू लागला आणि 'कितीही बोलले तरी अमुक एक गृहस्थ आपल्या तोंडाला मुरकुटीही पडू देत नाही', असे वर्णन त्याला करायचे असेल तर तो लिहील, 'लोक इतके अद्वातद्वा बोलले; पण त्याने तोंडावरची इस्त्री बिलकूल बिघडू दिली नाही'. एखादा प्रयत्न जर नीट साधला नाही तर तेली लेखक म्हणेल, 'हा घाणा नीट निघाला नाही.'

एखाद्या वक्त्याच्या बोलण्यातील तत्त्व सुमारच असेल, पण त्याने कडक भाषा वापरली असेल, तर त्याचा कोष्टी टीकाकार म्हणेल, 'वक्त्याने भाषणाला खळ फार लावली आहे. वास्तविक पाहता त्यातले सूत अगदीच नरम आहे.' परदेशातून नाना प्रकारची तत्त्वे इकडे आणावी, पण आपल्याला कोणते मानवते ते पत्करावे आणि बाकीचे टाकावे, हा विचार मांडताना कोष्टी लेखक म्हणेल, 'जांगड माल वाटेल तितका आणावा. पसंत पडेल तो ठेवून घेऊ, बाकीचा परत पाठवू.'

'आपण आपले साधे गडी आहो', असे शेतकरी वक्त्यास सांगायचे असेल,तर तो म्हणेल,'माझं बोलणं अगदी रायवळ आहे. विद्यार्थ्यांना एखादा विषय एकदा समजावून सांगितला, पुन्हा समजावून सांगितला; पण तरीही तो विद्यार्थ्यांना समजला नाही, तर मूळचा रंगारी असलेला शिक्षक स्वतःशी उद्गार काढील, 'तिसरा हात द्यायला पाहिजे.'

अशा तऱ्हेने मराठीतील शब्दांचा भरणा झपाट्याने वाढेल. याचा अर्थ असा, की आपल्या समाजात शिक्षण फैलावले पाहिजे. लिहिणे, बोलणे हे व्यवसाय सर्व वर्गांत फैलावले पाहिजेत. तसे झाले म्हणजे सर्व समाजाच्या निरनिराळ्या वासना, त्यांचे राग-लोभ, त्यांच्या आकांक्षा चित्रविचित्र शब्दांची

रूपे धारण करून पुढे येतील. एकीकडे सर्व समाजांचे मनोगत व्यक्त होण्याचे कार्य होईल आणि दुसरीकडे शब्दकोश पुष्ट होत जाईल.

## शब्दार्थ व टिपा :

**हेलकरी**— —ओझे वाहणारा; हमाल. **संकेत**—समाजाने मान्य केलेली एखादी कल्पना. **उत्पात**—मोठे संकट. **रंधणे**—एक प्रकारच्या हत्याराने लाकूड तासणे. **पुष्टिपत्र**—लिहिताना कागदाखाली घेतलेला जाड आधार. **अटणी**— अडथळ्यासाठी ठेवलेले लाकूड. **जांगड माल**—पाहून पसंत करण्यासाठी पैसे न देता परतीच्या बोलीवर आणलेला माल. **रायवळ**—साधे.

## प्रश्न :

१. रबराच्या उपयोगातून कोणता शब्द आपल्या भाषेला मिळाला?
२. 'हरताळ' या शब्दाचा मूळ अर्थ काय? पुढे त्याला कोणता अर्थ प्राप्त झाला?
३. सुतारखान्यातून आपण कोणता शब्द उचलला? त्याचा उपयोग कशासाठी होऊ लागला?
४. कोष्टी, शेतकरी, रंगारी यांच्या लिहिण्या-बोलण्यातून भाषेला कोणकोणते शब्द मिळण्याजोगे आहेत?
५. गवंडी, परीट, तेली यांनी वाङ्मय लिहिले पाहिजे, असे लेखकाला का वाटते?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. उद्वेग, प्रांगण, जांगड, गावरानपणा, मनोगत — या शब्दांचा उपयोग करून वाक्ये तयार करा.
२. लोहार, डॉक्टर, कुंभार या किंवा इतर काही व्यवसायांतील माणसे लिहीत आहेत, बोलत आहेत अशी कल्पना करा आणि त्यांच्याकडून कोणते नवीन शब्दप्रयोग मिळू शकतील ते टिपून ठेवा.

★ ★ ★



# २४. सहल

**ना. सी. फडके**

**नारायण सीताराम फडके** (जन्म : १८९४; मृत्यू : १९७८) कादंबरीकार, कथाकार, लघुनिबंधकार. 'दौलत', 'जादूगार', 'कलंकशोभा', 'अखेरचे बंड' इत्यादी कादंबऱ्या. 'गुजगोष्टी', 'धूम्रवलये' इत्यादी लघुनिबंधसंग्रह. 'बावनकशी', 'अत्तर-गुलाब' इत्यादी कथासंग्रह. नाट्य, संगीत या विषयांवरही लेखन.

हा लघुनिबंध त्यांच्या 'गुजगोष्टी' या संग्रहातून घेतला आहे. दिवसाच्या वेगवेगळ्या वेळी रमतगमत केलेली सहल आणि ती करताना मिळणारा आनंद याचे चित्रण या पाठात केले आहे.

---

**पायी** फिरायला जायच्या अनेक वेळा आहेत आणि अनेक तऱ्हा आहेत. मला त्या सगळ्याच वेळा आवडतात;पण सगळ्या तऱ्हा मात्रआवडत नाहीत. अमुकच वेळी फिरायला जाण्यात मजा आहे असं ज्यांना वाटत असेल, त्यांना फिरायला जाण्यातलं खरं सुख समजलंच नाही असं मी म्हणेन. फेरफटका करण्याच्या मजेला वेळेचं बंधन कुठलं? फिरायला केव्हाही जावं. त्यापासून जो आनंद मिळायचा तो मिळणारच!

संध्याकाळी रपेट करण्यात जशी मजा आहे, तशीच ती सकाळी करण्यातही आहे. नव्हे, स्थळ अनुकूल असेल, तर भर दुपारच्या घटकेलाही करण्यात आहे. मी महाबळेश्वरला गेलो म्हणजे तर कटाक्षानं भर दोनप्रहरी हिंडायला निघतो. त्या वेळी गर्दहिरव्या झाडींनं झाकलेल्या लाल रस्त्यावर सूर्यप्रकाशाचे लहानमोठे कवडसे सरळ माथ्यावरून पडलेले असतात. उजव्या-डाव्या बाजूंकडच्या वृक्षराजींच्या शाखांच्या फटींतून दिसणाऱ्या आकाशाला मोठा मनोहर फिकट निळा रंग चढलेला असतो. सकाळच्या व संध्याकाळच्या घटकेला ऐकू येणारी पक्ष्यांची किलबिल त्या वेळी अगदी बंद

असत. सारे पक्षी कुठं नाहीसे होतात, कोण जाणे! रात्रीची शांतता आणि दिवसाचा पूर्ण प्रकाश यांचा त्या वेळचा तो मिलाफ अतिशय आल्हादकारी असतो. त्या आल्हादाचा अनुभव घेत फिरणारे आपण पृथ्वीवर आहोत, की अंतराळातूनच तरंगत चाललो आहोत, असा गमतीचा भास क्षणभरतरी झाल्यावाचून राहत नाही.

संध्याकाळच्या फिरण्यात मौज नाही असं माझं म्हणणं नाही. त्या घटकेलाही आपल्या भोवतालच्या सृष्टीला आल्हादकारक स्वरूप प्राप्त झालेलं असतं. सूर्य झरझर खाली पश्चिमक्षितिजाकडं उतरत असतो, त्या लालसर सोनेरी प्रकाशानं वस्तुमात्राला काही विलक्षणच शोभा आलेली असते. निसर्गतःच शोभिवंत असणारी फळाफुलांची झाडं तर रम्य दिसतातच; पण शेताभोवतालची कुंपणवजा रानवट झाडंझुडपंही खुलून दिसतात. स्वभावतःच सौंदर्यसंपन्न असलेले जलाशयच नव्हे, तर राकट दगडाधोंड्यांनी विखुरलेल्या लहानमोठ्या टेकड्यादेखील दृष्टीला सुखदायक वाटतात. अशा एखाद्या टेकडीच्या माथ्यापर्यंत चालत जाऊन तिथं विसाव्यासाठी उभं राहिलं आणि मागं टाकलेल्या शहराकडं अगर गावाकडं वळून पाहिलं, की सूर्यप्रकाशाच्या त्या भडक झळाळीत देवळांची सुवर्णशिखरं अगर राजप्रासादाची डौलदार शृंगंच नव्हे, तर साध्या चंद्रमौळी घरांची छपरंदेखील, किती रमणीय दिसतात!

सकाळी फिरायला जाण्याचा आनंद काही निराळाच आहे. एक तर सृष्टी जागी होत आहे, त्याच घटकेला आपणही उठलो आहोत ही जाणीवच मोठी सुखाची असते. त्या जाणिवेनं आपण सृष्टीशी समरस झालो आहोत, असं वाटू लागतं. चित्ताला आणि दृष्टीला अपूर्व ताजेपणा येतो. पूर्वक्षितिजाखालून भला मोठा तेजोगोल डौलानं वर वर चढलेला दिसतो. खेड्यापाड्यांतून भाज्या किंवा गवत डोक्यावर घेऊन येणाऱ्या बायका मग अधिकच झपाझप चालू लागलेल्या दिसतात. ओझ्याचा आणि वाटचालीचा शीण विसरण्यासाठी सुरू असलेल्या त्यांच्या ग्रामगीतांची लयही वाढल्यासारखी वाटते.

चांदण्या रात्री तर फिरण्याची मिजास काही औरच असते. मी कॉलेजात होतो तेव्हा वसतिगृहापासून जवळ असलेल्या टेकडीवर भटकायला जाऊन

अपरात्री एक-एक, दोन-दोन वाजेपर्यंत आम्ही कितीदातरी तिथं बसलो असू. त्या वेळी गप्पागोष्टींना आणि हसण्याखिदळण्याला ऊत येई. ज्यांना गाता येत असे ते गात आणि ज्यांना येत नसे तेही गात. कोणी नाटकातली भाषणं खड्या आवाजात म्हणत. मी कधी कधी बासरी वाजवत असे किंवा कधी गप्पांत सामील होत असे. परंतु मला अगदी मनापासून आवड वाटे, ती टेकडीच्या माथ्यावरच्या शिलातलावर खुशाल उताणं पडून आभाळात तरंगणाऱ्या चंद्रबिंबाकडं टक लावून पाहण्याची. तसं पडून पाहिलं, की पृथ्वीवरच्या साऱ्या वस्तू दृष्टिआड होत. नभोमंडळातल्या तुरळक तारका आणि सहस्रधारांनी चंद्रिकेचा वर्षाव करणारा मध्यावरचा दीप्तिमान गोल यांखेरीज काहीच दिसत नसे. स्वर्ग व पृथ्वी यांतील अंतर एकदम नाहीसं झाल्याचा भास होई.

फिरण्याच्या सगळ्या तऱ्हा मात्र मला आवडत नाहीत. व्यायामासाठी चालणं आणि फेरफटका करणं यांत महदंतर आहे. व्यायाम व्हावा अशा तऱ्हेनं चालणं अशक्य नाही; पण त्या चालण्याला सहल करणं कसं म्हणता येईल? धावपळीच्या चालण्यानं व्यायाम होईल; पण त्यात फिरण्याची मौज मिळायची नाही. व्यायाम हवा असेल, तर फिरण्याची बुद्धी टाकली पाहिजे आणि फिरायचं असेल, तर व्यायामाची कल्पना मनात ठेवता कामा नये.

याच दृष्टीनं चार मित्रांच्याबरोबर गप्पा मारत फिरायला जाण्याची तऱ्हाही मला पसंत नाही. अशा फिरण्यात धड गप्पाही होत नाहीत आणि धड सहलही होत नाही. बोलणं आणि फिरणं यांचा स्वभावतःच विसंवाद आहे, अशी माझी समजूत आहे. म्हणून खरी सहल करायची झाली म्हणजे एकदेखील मित्र बरोबर नसावा, असं मला वाटतं. मी एकटाच घराबाहेर पडतो आणि मन मानेल त्या दिशेनं चालू लागतो.

अशा वेळी अमक्या स्थळापर्यंत जायचं असं मी मनाशी योजत नाही. पुष्कळांची फिरण्याची पद्धत अशी असते, की विवक्षित स्थळी पोचून तिथून परतण्याच्या कल्पनेनं ते निघतात. ही कल्पना अगदी घातूक. सहल करण्यातली खरी मिजास या कल्पनेनं नाहीशी होते. अमक्या ठिकाणी जायचं असं मनाशी ठरवलं, की आपण आजूबाजूस लक्ष न देता सरळ त्या स्थळी

जातो. असं केल्यावर सहल ती काय राहिली?

स्वच्छंदानं रमतगमत जाणं म्हणजेच खरी सहल. आमच्या कोल्हापूरला रंकाळा तलाव आहे. त्याची सबंध फेरी काढण्यासाठी पुष्कळ मंडळी संध्याकाळी बाहेर पडतात. मीही त्या बाजूला कधी कधी फिरायला जातो; परंतु फेरी पुरी करायच्या निश्चयानं मी कधीच निघत नाही. वाटेत जिथं माझं मन रमेल तिथं मी खुशाल दहा-पाच मिनिटं उभा राहतो. एखाद्या वेळी बसायची लहर आली तर बसतोदेखील. असं केल्यानं माझं चित्त रिझवणाऱ्या किती गोष्टी मला आढळतात त्यांना गणतीच नाही. मधेच कुठंतरी गुडघाभर वाढलेल्या गवताच्या टोकांवर निमिषमात्र बसणारी व लगेच उडणारी फुलपाखरं एकमेकांत शिवाशिवीचा डाव खेळत असतात. पुरं पाऊलही ज्यात बुडणार नाही अशा एखाद्या उथळ जलसंचयात हरतऱ्हेचे शेकडो कीटक तरंगत असतात. अशा वेळी त्या कीटकांच्या क्षुद्रपणाकडं माझं लक्ष जातच नाही. ते ज्या मिजाशीनं त्या इवल्याशा जलपृष्ठावर तरंगत असतात, तिच्या सौंदर्याचा मनाला मोह पडतो. एकदा अशा एका जलसंचयातला तो कीटकांचा थवा कशानंतरी विलक्षण क्षुब्ध झाला होता. ठिपक्यांएवढाले ते सारे जीव जणू प्राणावर उदार होऊन चेवानं एकमेकांवर तुटून पडत होते. त्यातही माझ्या दृष्टीला सौंदर्य दिसलं. त्यांचा तो मनोहर प्रक्षोभ पाहत कितीतरी वेळ मी उभा राहिलो.एखाद्या स्थळी पांढऱ्या स्वच्छ बगळ्यांचा थवा लव्हाळ्यांच्या उंच उंच पात्यांखाली बसलेला असतो आणि गंमत अशी, की थवा करून बसलेले ते बगळे एकमेकांशी एक शब्ददेखील बोलत नाहीत. चिमण्यांचा थवा जमला, की चिवचिवाट सुरू होतो. दहा कावळे जमले, की कावकाव माजते. हे बगळे मात्र अगदी निःशब्द का बसतात, हे कोडं मला कधी उलगडलेलं नाही. त्यामुळं मी मोठ्या विस्मयानं आणि कुतूहलानं त्यांचा तो थवा पाहत बसतो. ते बगळे जसे तिथं उगीचच येऊन बसतात, तसेच काही वेळानं उगीचच उडून जातात. मग मीही तिथून उठतो व आपल्या वाटेनं पुढं होतो. कुठं मोट चाललेली असते आणि तिच्या धावेच्या 'कुइ-कुइ' अशा आवाजात विहिरी-शेजारच्या आंब्यावरची कोकिळा आपला 'कुहु-कुहु' शब्द मिसळत असते.

मी लोभावून तिथं थबकतो. मधेच स्वयंस्फूर्तीनं फोफावलेल्या एखाद्या रानवट फुलझाडांचा मोठा मोहक ताटवा बाजूला दिसतो. तो दिसल्यावर रस्ता सोडून त्या ताटव्याजवळ गेल्याशिवाय मला राहवत नाही. एखाद्या वळणावर दोन्ही बाजूंच्या वृक्षशाखांची गमतीदार कमान झालेली असते आणि त्या कमानीतून क्षितिजावरच्या सूर्यमंडलाचा देखावा अवर्णनीय भासतो. तो ओझरताच पाहून आपल्या वाटेनं जाणारी माणसं दुर्दैवी म्हटली पाहिजेत. मधेच कुठंतरी एखाद्या पुलाच्या खाली बाभळीची झाडं बहरलेली असतात. त्यांचे केशरगुच्छ खुडून घेण्यात मी खुशाल पाच-दहा मिनिटं घालवतो.

अशा स्वच्छंदानं, एकट्यानं रमतगमत सहल केली, तरच ती खरी सहल! अशा सहलीपासूनच खरा आनंद होतो. इतकंच नव्हे, तर आपलं जीवन म्हणजेदेखील एक सहलच होय, असं माणसानं मानलं, तरच तो सुखात राहील. माणसानं एकमार्गी असावं आणि आजूबाजूस दृष्टी न टाकता सरळ जावं, असा उपदेश पुष्कळदा करण्यात येतो; पण मला वाटतं, हा सल्ला काही फारसा हिताचा नाही. किंबहुना बहुतेक माणसांच्या दुःखाचं कारण ती एकमार्गी असतात हेच असतं. त्यांना आपल्या धंद्याखेरीज काही दिसत नाही. मुक्काम गाठण्यासाठी ती धावत असतात, घामाच्या धारा पुसत असतात आणि अजून किती मजल उरली आहे, ते पुन्हा पुन्हा टाचा उचलून व माना उंचावून पाहत असतात. अशा सर्वांना त्यांच्या हिताची एकच गुजगोष्ट सांगतो, की त्यांनी जीविताच्या रस्त्यावरून धावत-पळत जाण्याऐवजी रमतगमत स्वच्छंदानं सर्व सुंदर वस्तूंचा आस्वाद घेत सहल करावी. मग सुखाचा शोध निराळा करायला नको.



## शब्दार्थ व टिपा :

**कटाक्षाने**—निश्चयाने. **वस्तुमात्र**—सर्व वस्तू. **शृंग**—शिखर; कळस. **चंद्रमौळी घर**—ज्याच्या छपरातून चंद्रकिरणांचा प्रवेश होतो असे (म्हणजे मोडकळीस आलेले, जीर्ण झालेले) घर. **मिजास**—ऐट. **शिलातल**—मोठ्या दगडाचा, पाषाणाचा काहीसा सपाट पृष्ठभाग. **विसंवाद**—एकमेकांशी न जुळणे. **विवक्षित**—विशिष्ट. **स्वच्छंदाने**—मुक्तपणाने; मन मानेल तसे. **निमिषमात्र**—क्षणभर. **प्रक्षोभ**—रागाचा भडका. **लव्हाळे**—जलप्रवाहाच्या काठी वाढणारे एक प्रकारचे गवत. **स्वयंस्फूर्तीने**—स्वतःच्या प्रेरणेने; स्वतःच्या इच्छेने. **गुजगोष्टी**—गुप्त गोष्ट; मनात जपलेले गुपित.

**प्राणावर उदार होणे**—जिवाची पर्वा न करणे.

## प्रश्न :

१. महाबळेश्वरला दुपारी रपेट करताना लेखकाला आनंद का वाटला?
२. सकाळी व संध्याकाळी सृष्टीची कोणती रूपे लेखकाला आल्हाददायक वाटतात?
३. चांदण्या रात्री फिरण्यातला आनंद और आहे, असे लेखक कशामुळे म्हणतो?
४. व्यायामासाठी फिरणे व फेरफटका करणे यांत काय फरक आहे?
५. एकमार्गी वृत्ती कशाला म्हटले आहे? एकमार्गी लोकांच्या वाट्याला दुःख कशामुळे येते?
६. सुखी जीवन जगण्यासाठी आपण काय करावे, असे लेखकाने म्हटले आहे?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. या पाठात काही सुभाषितवजा वाक्ये आहेत. उदा. 'आपलं जीवन म्हणजेदेखील एक सहल आहे', अशी आणखी काही वाक्ये शोधा आणि आपल्या वहीत ती लिहा.
२. पुढील शब्दांचे विरुद्ध अर्थाचे शब्द सांगा व त्यांतील अर्थभेद स्पष्ट करा :
विसंवाद, दुर्दैवी, राकट, सुखदायक, अनुकूल.
३. तुम्ही फिरायला गेला आहात आणि अगदी अचानक धो-धो पाऊस पडू लागला तर भोवतालचे दृश्य कसे दिसेल, याचे वर्णन करा.

* * *



# २५. आभाळाएवढी माया

## सरोजिनी बाबर

**सरोजिनी कृष्णराव बाबर** (जन्म : १९२२) 'समाजशिक्षणमाले'च्या संपादिका. महाराष्ट्र राज्य लोकवाङ्मय समितीच्या अध्यक्षा. या समितीच्या वतीने प्रसिद्ध झालेल्या 'जा माझ्या माहेरा', 'बाळराजा', 'एक होता राजा', 'कुलदैवत' इत्यादी अनेक ग्रंथांचे संपादन. 'नव्याची पुनव', 'डोंगरची मैना', 'चिंचेची पत्रावळ' इत्यादी कथासंग्रह. 'आठवते तेवढे सांगते', 'यशोधरा' इत्यादी कादंबऱ्या. 'वनिता-सारस्वत' हा संशोधनपर ग्रंथ.

आईच्या मायेची महती लोकगीतांतून कशी गायलेली आहे ती या उताऱ्यात वाचा.

---

**माय** म्हणजे शुद्ध गंगेचं उदक. तिच्या मायेची शाल अंगावर घेताना किती प्रसन्न वाटतं! माय बाळराजाचं कौतुक करू लागली, की पाहावं तिचं न्यारं रूप! बाळराजाला न्हाऊमाखू घालताना, त्याची आर्जवं करत भरवताना, त्याच्याशी बोलताना आईच्या उरीपोटी माया दाटून येते.

तुम्हाआम्हांला आईच्या मायेनं घडवलेलं असतं. टिप्पूर चांदण्यात रमतगमत फिरताना आपलं मन कसं सुखावतं! तसाच अनुभव आईच्या सहवासात येतो. गावच्या आयाबहिणींनी गायलेल्या ओव्या आठवतात अजून. एकजण म्हणते ---

**झाडामंदी ग झाड, सये, आंब्याचं डेरेदार**
**संगीते मैना तुला, सर्व्या गोतात आई थोर**

आईचं दैवत सर्व दैवतांत थोर. हाताचा पाळणा करून तिनं सांभाळलेलं. चंद्र आकाशात उगवला, की सागराचं हृदय कसं उचंबळून येतं! तसं आईचं दर्शन झालं, की आपलंही अंतःकरण भरून येतं. आईची माया आकाशाएवढी असीम! तिच्या शब्दाशब्दात अमृताचा गोडवा असतो.

मुलगी लग्न होऊन सासरी नांदू लागली, की तिला वारंवार आपल्या 'माय'ची आठवण येते. सणासुदीला तिचे डोळे माहेरच्या वाटेनं आईकडं धावू लागतात. आई कुण्या गावात अन् ती कुठंतरी दुसऱ्या गावात; पण लेकीचं मन आईच्या जवळ. तिच्या मनी गाणं फुलू लागतं —

भुक्याली तान्याली, मला कोण न म्हणील
एक माजी माय, त्वांड कोमेजं जाणील

हे खरंच आहे. आईलाच आपल्या मुलाबाळांची काळजी. एखाद्या घारीसारखं आईचं चित्त आपल्या पिलांपाशी. रात्रंदिवस तिच्या मनात मुलाबाळांची आठवण, तर मुलंबाळं आईच्या आठवणींत गुंतलेली. आईची आठवण आली, की सांगायचं कुणाला? जुन्या काळी मुली जात्यावर बसत. जात्यावर दळण करत. सुखदुःखाच्या गोष्टी सांगाव्याशा वाटत. आपलं मन जात्यापाशी मोकळं करताना तिला केवढं बरं वाटतं! दळणाची पाटी पुढं ओढून ती आपल्या जात्याला मोत्यापोवळ्यांचा घास भरवते आणि मग जातं हरणागत पळत सुटतं. तिचं मन आईच्या प्रेमाची महती गाऊ लागतं —

किती मी ओव्या गाऊ माऊलीच्या त्या प्रेमाला
कोण प्रदक्षिणा घाली आकाशीच्या त्या सीमेला?
माझी माय माऊली नित तुळशीखाली बसं
मालनी माझी माय हुबेहुब गंगा दिसं
आईइतकी माया नाही कोणत्या गोताला
जिरुनी गेलं तूप साळीच्या ग भाताला
दळान दळीते मी जसं हरान पळतं
मायमाऊलीचं माझ्या दूध मनगटी खेळतं

शेतीवाडीतील घरात जात्याशी गुजगोष्टी करताना तिचं भान हरपून जातं. तिच्या या गुजगोष्टी लाख मोलाच्या. मोकळ्या मनाच्या. तिथं भीडभाड नाही. कोण काय म्हणेल याची धास्ती नाही. वेळ मिळेल तेव्हा जात्यावर बसावं आणि मनसोक्त बोलावं. जात्यावर बसायचं म्हणजे जणू आपलं आपण स्वतःचंच राज्य चालवायचं ही भावना.



आईला भेटावे असं तिला वाटतं, तर आईनंच एखाद्या वासराच्या ओढीनं धावत जाणाऱ्या गाईप्रमाणं यावं आणि आपल्याला पोटाशी धरावं, असंही तिला वाटतं. आपली आई घरी आली, की आपलं पोट कसं आनंदानं गच्च भरून जातं! तिच्या मनात एकेक ओळ घुमू लागते —

**शीतळ सावलीला पाखरं ग झाली गोळा**
**माझ्या माऊलीची माया विश्रांतीचा ग पानमळा**

**आईची माया मोठी जशी वडाची सावली**
**बयेच्या पंखांखाली विसावली रोप-वेली**

घरी आलेल्या आईला कुठं ठेवू अन् कुठं नको असं तिला होऊन जातं! ती गणगोतांना सांगू लागते —

दूध माऊलीचं सये, गोड अमृताचा झोणा
किती पिऊ बाई मी ग तृप्ती मनाची होईना!

गणगोतामंदी सये, माझी माऊली अधिक
माझी माय बाई, शुद्ध गंगेचं उदक!

कारण सासरी जाताना आईनं कितीतरी मोलाच्या गोष्टी सांगितल्या होत्या. आईची शिकवण जी आचरणात आणते,तिला सगळेजण नावाजतात. सासरी वावरताना मग कवतिकच वाट्याला येतं तिच्या. तिला आपल्या आईचा अभिमान वाटतो.

संसारात सर्व दिवस सारखे नसतात. कधी सुखाच्या वर्षावानं भिजून चिंब व्हावं, तर कधी लहानमोठ्या दुःखांशी झगडताना धीर सुटावा. दुखण्याखुपण्याच्या तडाख्यात सापडलं, की तिच्या जिवाला घोर लागतो. मग साहजिकच आईचा आसरा घ्यावासा वाटतो. माहेरघरचं कुणी भेटलंबिटलं तर ती आवर्जून सांगावा देते —

जिवाला जडभार सये, कुणाला घालू वजं
माझे मायबाई, व्हावं तातडीनं येणं तुझं

सांगावा पोचायच्या आतच आपली आई आल्याचा तिला भास होतो. मग ती सांगू लागते —

जिवाला माझ्या जड कसं कळालं माझ्या आई,
सांगते शेजीबाई परसदाराला होती आई

जिवाला माझ्या जड येळंला कोण होती
हाती अमृताची वाटी बया मध्यान राती येती

जिवाला माझ्या जड जावा बघती वाकूनी
माझी माय आली कामधंदा ग टाकूनी

आई आपल्या लेकीसाठी धावतच येणार. तिची माया आभाळाएवढी. तिच्या मायेच्या सावलीत लेकीचं दुःख कुठल्याकुठं पळून जातं. तिची माय

म्हणजे हक्काची धनदौलत. म्हणून मी सतत मनात गात असते —

**बाप्पाजी माझा वड माय माझी फुलजाई**
**दोगांच्या सावलीची काय सांगावी बडेजाई!**

## शब्दार्थ व टिपा :

**उदक** — पाणी. **न्यारं** — वेगळं. **संगीते** — सांगते. **सर्व्या** — सगळ्या. **असीम** — अमर्याद. **त्वांड** — तोंड. **दळान** — दळण. **हरान** — हरिण. **भीडभाड** — पर्वा; संकोच. **डोणा** — डोण; झाडाच्या बुंध्यापासून तयार केलेले पात्र. **नावाजणे** — स्तुती करणे. **जडभार** — जड ओझे. **वझं** — ओझं. **येळंला** — वेळेला.

**हाताचा पाळणा करून सांभाळणे** — अत्यंत काळजीपूर्वक पालनपोषण करणे. **मन मोकळे करणे** — सुखःदुःखाच्या गोष्टी बोलून दाखवणे. **जिवाला घोर लागणे** — खूप काळजी वाटणे.

## प्रश्न :

१. आईच्या सहवासात मुलांना कोणता अनुभव येतो?
२. आपले मन जात्यापाशी मोकळे करावे, असे सासरी असलेल्या मुलीला का वाटते?
३. सांगावा पोचायच्या आत आई आल्याचा भास तिला का होतो?
४. 'माझी माय शुद्ध गंगेचं उदक', असे ती का म्हणते?
५. 'आईची माया आभाळाएवढी' या शब्दांतील अनुभव कोणत्या प्रसंगातून येतो?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. 'माय म्हणजे शुद्ध गंगेचं उदक' या वाक्यात आईची महती गाइलेली आहे. अशी आणखी काही वाक्ये या पाठातून शोधा व ती लिहून ठेवा.
२. 'मायलेकी'च्या नात्याचे वर्णन करणाऱ्या ओव्यांचा संग्रह करा.
३. या पाठातील ओव्या सुरावर म्हणून पाहा.

★ ★ ★

# २६. विचारधन



## १.

### विनंती एवढीच

माझी सर्व जनांस एवढीच विनंती आहे, की तुम्ही सर्वजण विचार करण्यास लागा, वाचावयास लागा. नवीन ग्रंथ व वर्तमानपत्र वाचा व तुमचे शेजारी काय होत आहे याचा विचार करा. सारासार पहा, परंपरेने आंधळ्याची माळ लावली म्हणून तीच चालवू नका. सत्य बोला, दुष्ट वासना सोडा. जगासंबंधी ज्ञान सर्व लोकांत वृद्धिंगत करा. आळस सोडा. तुमच्यामध्ये वास्तविक बुद्धिमान असेल त्यास पुढारी करा. त्याचे अनुमताने चाला. सर्व लोकांची जूट असू द्या. आपसात फूट नसावी हे ध्यानात वागवा. विद्या अधिक होऊन तुमचे पाऊल पुढे पडू द्या. सर्व देशाची काळजी प्रत्येकजणाने करावी.

तुम्ही आपले मुलांची काळजी करून त्यांस शहाणी करा व सर्व लोकांची काळजी करा. नित्य काहीतरी सर्व देशाचे कल्याण केल्याशिवाय एक दिवस जाऊ देऊ नका. कोणास दुःख देऊ नये व सर्व लोकांचे हित करावे, स्वदेशाचे हित इच्छावे. सांप्रत आपले लोक फार वाईट अवस्थेत आहेत; सबब फार खबरदारी ठेवली, की या लोकांचे कल्याण होईल. तुम्ही आपल्यास योग्य करा, अब्रू वाढवा. पैका मिळाला तर अब्रू वाढते, असे नाही. खरेपणा व निर्मळपणा यांपासून अब्रू उत्पन्न होते.

विद्या केली तर त्याप्रमाणे वागणूक पाहिजे, नाहीतर विद्या व्यर्थ आहे. विद्या म्हणजे ज्ञान, जेणेकरून मनुष्य निर्मळ होतो, विचारी होतो.

— लोकहितवादी

२.

## समाजनौका



वृद्ध-तरुणांच्या आचारविचारांत कालमानाने व शिक्षणभेदाने थोडाबहुत फरक होतो; पण त्यामुळे त्यांत जमीनअस्मानाचे अंतर पडते असे नाही व असे होणे इष्टही नाही; कारण असे होऊ लागले तर कोणत्याही घरी कोणासही सुखाचा लवलेश मिळेनासा होऊन साऱ्या समाजात अहोरात्र चलबिचल माजून राहील. कोणाचा धाक कोणावर चालणार नाही व सगळ्याच प्रकारच्या सुधारणांस प्रचंड व्यत्यय येईल. सुधारणा करण्याची इच्छा जशी तरुणांस असते तशी वृद्धांस असत नाही. समाजाच्या असलेल्या स्थितीचे संरक्षण करण्याविषयी वृद्ध लोक अत्यंत उत्कंठ असतात. त्याचे पाऊल पुढे पडावे, अशी तरुणांस आकांक्षा असते. हे समाजनौकेचे भरताड होत, तरुण शिडे होत! पहिल्याशिवाय समाजात स्थिरता राहणार नाही, दुसऱ्याशिवाय त्याला गती येणार नाही. तेव्हा ज्यांच्या मनात समाजाचे कल्याण व्हावे असे असेल, ते या दोहोंचे फारकत व्हावे असे कधीही चिंतणार नाहीत. दोहोंचाही उपयोग आहे व दोघांनाही आपापला कार्यभाग उरकण्याची मोकळीक पाहिजे. प्रत्येक गोष्टीत बाबाने बेट्याला आपले वळण गिरविण्यास लावणे हे जसे वाईट, तसे आपली प्रत्येक गोष्ट बाबा ऐकून घेत नाहीत म्हणून बेट्याला त्याचा विषाद येणे हेही वाईट. दोघांच्या संमतीने जेवढे चालेल तेवढे हवेच आहे.

— गोपाळ गणेश आगरकर

३.

## यत्नरूप शक्ती



सामान्य लोक आपल्या उद्धाराची सर्व जबाबदारी उचलणारा परमेश्वर म्हणून कोणी एक आहे, असे मानतात आणि निष्क्रिय बनतात. परमेश्वरच आपल्या बुद्धीला प्रकाश पाडील असे मानून आपली बुद्धीही चालवत नाहीत. मोठ्या मनुष्याने आपल्या बुद्धीने प्राप्त करून घेतलेले ज्ञान हे परमेश्वरनिर्मित ज्ञान समजतात आणि त्याने लिहिलेले ग्रंथ पवित्र मानून त्यांतील शब्दनूशब्द कायम टिकणारा आहे, अशी श्रद्धा बाळगतात. त्यामुळे धर्माच्या नावाने अधर्माचरण चालू होऊन विद्या ही ज्ञानासाठी नसून विवादासाठी आहे, अशी अवस्था प्राप्त होते. अपूर्णत्वाकडून पूर्णत्वाकडे, अज्ञानातून ज्ञानःकडे अथवा अंधकारातून प्रकाशाकडे जाण्याची मनुष्याची जी यत्नरूप शक्ती ती म्हणजेच परमेश्वर होय. तूच परमेश्वर आहेस, परमेश्वरच जग आहे, तूच आपला उद्धार करू शकशील, यत्न हाच परमेश्वर आहे आणि परमेश्वर आहे, असे तुझी वाणी बोलत असली तरी तो निराळा नाही. विद्येच्या साहाय्याने व आपल्या प्रयत्नाने जगावर प्रभुत्व गाजवण्याचा आपला अधिकार तू प्राप्त करून घे– हा विचार म्हणजे आजपर्यंतच्या सर्व भारतीय तत्वज्ञानाचे सार अथवा अमृत आहे.

— आचार्य शं. द. जावडेकर



# १. नवा शिपाई

**केशवसुत**

**कृष्णाजी केशव दामले** (जन्म : १८६६; मृत्यू : १९०५) 'केशवसुत' या टोपण-नावाने कविता लेखन. आधुनिक मराठी कवितेचे शिल्पकार. समाजातील अनिष्ट रूढी, घातक परंपरा यांच्यावर हल्ला करणारी कविता. स्वातंत्र्य, बंधुत्व, समता व सामाजिक न्याय या मूल्यांचा आग्रह. त्यांची समग्र कविता 'केशवसुतांची कविता' या संग्रहात समाविष्ट केली आहे.

'नवा शिपाई' ही समतेचा व बंधुत्वाचा संदेश देणारी कविता आहे.

नव्या मनूतिल नव्या दमाचा शूर शिपाई आहे,
कोण मला वठणीला आणू शकतो ते मी पाहे!
ब्राम्हण नाही, हिंदुहि नाही, न मी एक पंथाचा,
तेच पतित की जे आखडिती प्रदेश साकल्याचा!

खादाड असे माझी भूक,
चतकोराने मला न सूख;
कूपातिल मी नच मंडूक;

मळ्यास माझ्या कुंपण पडणे अगदी न मला साहे!
कोण मला वठणीला आणू शकतो ते मी पाहे!





जिकडे जावे तिकडे माझी भावंडे आहेत,
सर्वत्र खुणा माझ्या घरच्या मजला दिसताहेत;
कोठेही जा – पायांखाली तृणावृता भू दिसते;
कोठेही जा – डोईवरते दिसते नीलांबर ते!

सावलीत गोजिरी मुले,
उन्हात दिसती गोड फुले,
बघता मन हर्षून डुले;

ती माझी, मी त्यांचा — एकच ओघ अम्हांतुनि वाहे!
नव्या मनूतिल नव्या दमाचा शूर शिपाई आहे!



## शब्दार्थ व टिपा :

**मनू**—युग; काळ. **पतित**—पापी. **आखडणे**—संकुचित करणे; मर्यादा घालणे. **साकल्य**—संपूर्णता. **कूप**—विहीर. **मंडूक**—बेडूक. **तृणावृता**—गवताने आच्छादलेली. **नीलांबर**—निळे आकाश. **कुंपण**—मर्यादा.

**वठणीला आणणे**—धाक दाखवून योग्य मार्गावर आणणे.

**कूपमंडुक**—विहिरीतल्या बेडकाला ती विहीर म्हणजेच सर्व जग वाटते, त्याप्रमाणे संकुचित वृत्ती असलेला.

## प्रश्न :

१. 'शिपाई' हा शब्द या कवितेत कोणत्या अर्थाने योजला आहे?
२. या शिपायाच्या मते कोण पापी आहेत? का?
३. 'सर्वत्र खुणा माझ्या घरच्या मजला दिसताहेत', या ओळीचा अर्थ तुमच्या शब्दांत सांगा.
४. या नव्या शिपायाला कोणकोणत्या गोष्टींमुळे आनंद होतो?
५. या कवितेत कवीने समतेचा व बंधुभावाचा विचार सांगितला आहे. तो कोणकोणत्या ओळींतून व्यक्त झाला आहे ते सांगा.

## स्वाध्याय व उपक्रम :

१. या कवितेत आवेश आहे. हा आवेश व्यक्त करणारे शब्द शोधा व ते लिहा.
२. ही कविता योग्य चालीवर सामूहिक रीतीने समारंभात सादर करा.

★ ★ ★



# २. करु जग शोभावंत!

**यशवंत**

**यशवंत दिनकर पेंढरकर** (जन्म : १८९९; मृत्यू : १९८५) 'यशवंत' या नावाने काव्यलेखन. 'राजकवी' ही पदवी बडोदे संस्थानाने त्यांना दिली. शासनाने 'महाराष्ट्र-कवी' ही पदवी देऊन गौरव केला. 'यशवंती', 'यशोधन', 'यशोनिधी', 'ओजस्विनी', 'वाकळ' इत्यादी काव्यसंग्रह. 'बंदीशाळा', 'काव्यकिरीट', 'जयमंगला' इत्यादी खंडकाव्ये. 'छत्रपती शिवराय' हे महाकाव्य. 'मोतीबाग' हा बालगीतसंग्रह.

ही कविता 'पाणपोई' या त्यांच्या निवडक कवितांच्या संग्रहातून घेतली आहे. नदीचे जीवन किती निःस्वार्थी असते आणि निरपेक्षपणे ती सतत लोकसेवा कशी करते, याचे दर्शन या कवितेत घडते.

---

करिते का कधि खंत
सरिता करिते का कधि खंत?

रांगत लोळत दौडत घोळत
कडेकपारीतुनी खळाळत
आक्रमिते निज पंथ।





फुलो चांदणे, असो ग्रीष्मदिन
असो तमिस्रा ढगाळ भीषण
समान शिशिर वसंत।

कुणी आणिली घागर मृण्मय
पखाल किंवा कलश हिरण्मय
पहावया न उसंत।

करोत मज्जन रूप-यौवना,
दुर्जन, सज्जन, जरठ, अंगना
असो रंक धनवंत!

करोत कोणी अस्थि-विसर्जन
ताबुत किंवा देवगजानन
स्वागतशील उदंत!

मरुभूमीतुन दहनभूमितुन
गात चालली एकच गायन —
'करु जग शोभावंत!'

भेदभाव परि निर्मुनि, मानव —
होई दानव; तरंगिणी लव —
गणी न हंस तरंत।

असे संतसम जीवित आखुन
आसमंत ही करीत पावन
वरिते सिंधु अनंत
सरिता विश्रुत-चरित दिगंत

## शब्दार्थ व टिपा :

**सरिता, तरंगिणी**—नदी. **तमिस्रा**—अंधारी रात्र. **मृण्मय**—मातीपासून तयार केलेली. **हिरण्मय**—सोन्यापासून बनवलेला. **मज्जन**—बुडी. **जरठ**—वयोवृद्ध. **अंगना**—स्त्री. **उदंत**—परिपूर्ण. **मरुभूमी**—वाळवंट. **लव**—थोडेदेखील. **तरंत**—बेडूक. **विश्रुत-चरित**—प्रसिद्ध चरित्र असलेली. **दिगंत**—दशदिशांत; चोहोकडे.

## प्रश्न :

१. नदीच्या प्रवाहाचे वर्णन कोणकोणत्या शब्दांत केले आहे?
२. नदीला कशाकडे लक्ष द्यायला वेळ नसतो?
३. ती कोणाकोणाचे आनंदाने स्वागत करते?
४. मानवाचा दानव कशामुळे होतो?
५. नदीचे जीवन संतासारखे आहे, असे कवी का म्हणतो?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. ढग आणि वृक्ष यांचे नदीसारखे विशेष दाखवणारे एकेक परिच्छेद लिहा.
२. नदीकाठच्या दृश्याचे चित्र काढा किंवा त्याचे वर्णन करा.

★ ★ ★



# ३. बालमित्रास

**वि. म. कुलकर्णी**

**विनायक महादेव कुलकर्णी** (जन्म : १९१७) 'पहाटवारा, 'कमळवेल', 'आश्विनी' इत्यादी त्यांचे काव्यसंग्रह. सुबोध शैलीत कौटुंबिक विषयांवर काव्य लिहिणारे कवी.

'बालमित्रास' ही कविता 'आश्विनी' या संग्रहातून घेतली आहे. कवी शहरात राहायला गेल्यावर त्याला खेड्यातील बालपणाच्या आठवणी येतात. शहरी जीवन व ग्रामीण जीवन यांतील भेद त्याला तीव्रपणे जाणवतो, याचे वर्णन या कवितेत केले आहे.

आठवते ना —
ओढ्याकाठी अपुल्या घरची
गाय घेउनी धावत होतो
चरावयाला सोडुनिया तिज
पारंब्यांवर लोंबत होतो!

आठवते ना —
डोहामधले स्वैर डुंबणे
अंगावरिचे ओले कपडे
अंगावरती तसेच सुकणे,
सुकता कपडे पुन्हा पोहणे...

आठवते ना —
करवंदाचा चीक बिलगता
बोटे अपुली बसली चिकटुन
अन् कैऱ्यांच्या दिवसांमध्ये
हातकातडी गेली सोलुन!



आठवते ना –
हातामध्ये हात घालुनी
अर्धा डोंगर गेलो चढुनी
वर्गामधल्या गोष्टी बोलत
उन्हात फिरलो शेतांमधुनी!

– मला तरी नित आठवते गा,
आठवते ते फुलते जीवन
आक्रसलेल्या चाळिमधे या
उबगुनि जाता देह आणि मन

## शब्दार्थ व टिपा :

**उबगणे** –कंटाळणे; वीट येणे. **आक्रसलेली चाळ** –खुराड्यासारखी कोंडमारा करणारी चाळ.

## प्रश्न :

१. ओढ्याकाठची कोणती आठवण कवीला येते?
२. डोहावर पोहताना ते दोघे मित्र कोणकोणत्या गमती करत असत?
३. कैऱ्या, करवंदे खाताना त्यांना कोणता अनुभव आला?
४. हातात हात घालून ते दोघे कुठे कुठे फिरत असत?
५. या आठवणी झाल्यावर कवीला आज काय जाणवते?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. तिसरी-चौथीतील तुमच्या बालमित्राच्या/मैत्रिणीच्या काही गमतीदार आठवणी लिहा.
२. या कवितेत 'हात' हा शब्द आला आहे. या शब्दावर आधारित आणखी काही वाक्प्रचार शोधा व त्यांचा वाक्यात उपयोग करून ती लिहा. जसे– हात देणे म्हणजे एखाद्याला मदत करणे.

* * *



# ४. मन

**बहिणाबाई चौधरी**

**बहिणाबाई नथुजी चौधरी** (जन्म : १८८० ; मृत्यू : १९५१) शेतकरी कुटुंबात जन्म. शालेय शिक्षण मिळाले नसले तरी त्यांना काव्यशक्ती जन्मतःच लाभली होती. भोवतालच्या जीवनाचे निरीक्षण व निसर्गावरील प्रेम त्यांच्या कवितेतून सहजपणे व्यक्त होते. खानदेशातील अहिराणी बोलीत लिहिलेल्या त्यांच्या कवितेत जीवनातील सखोल अनुभवांचे चित्रण आढळते.

ही कविता 'बहिणाईची गाणी' या संग्रहातून घेतली आहे. मानवी मनाच्या किती विविध प्रवृत्ती असतात, याचे दर्शन येथे घडते.

---

मन वढाय वढाय
उभ्या पीकातलं ढोर
किती हाकला हाकला
फिरी येतं पिकावर.

मन मोकाट मोकाट
त्याले ठायी ठायी वाटा
जशा वाऱ्यानं चालल्या
पान्यावऱ्हल्या रे लाटा.

मन जह्यरी जह्यरी
याचं न्यारं रे तंतर
आरे, इचू, साप बरा
त्याले उतारे मंतर!

मन पाखरू पाखरू
त्याची काय सांगू मात?

आता व्हतं भुईवर
          गेलं गेलं आभायात!

मन एवढं एवढं
          जसा खाकसचा दाना
मन केवढं केवढं?
          त्यात आभाय मायेना!

## शब्दार्थ व टिपा :

**वढाय** –ओढाळ. **फिरी** –पुन्हा पुन्हा. **पान्यावऱ्हल्या** –पाण्यावरच्या. **जह्यरी** –विषारी. **मात** –महती; चमत्कार. **खाकस** –खसखस.

## प्रश्न :

१. मनाचा ओढाळपणा, मोकाटपणा व जहरीपणा सांगताना बहिणाबाईंना कशाकशाची आठवण येते?
२. 'मन पाखरू पाखरू' असे का म्हटले आहे?
३. मनाचा लहानपणा आणि मोठेपणा दाखवण्यासाठी कोणती उदाहरणे दिली आहेत?
४. या कवितेत अनेक सुंदर कल्पना आहेत; त्यांतील तुम्हांला सर्वांत अधिक आवडणारी कल्पना कोणती? का?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. माणसाच्या मनाचा लहानपणा व मोठेपणा दाखवणारी तुमच्या अनुभवातील उदाहरणे लिहा.
२. ही कविता अहिराणी बोलीत आहे. 'वढाय' या शब्दासारखे या बोलीतील आणखी काही शब्द या कवितेतून शोधा आणि त्या अर्थाचे तुम्हांला माहीत असलेले दुसरे शब्द लिहा.

★ ★ ★



# ५. आला आषाढ-श्रावण

**बा. सी. मर्ढेकर**

**बाळ सीताराम मर्ढेकर** (जन्म : १९०९; मृत्यू : १९५६) मराठी नवकाव्याचे प्रणेते. त्यांनी कवितेला नवे वळण दिले आणि मराठी कविता श्रीमंत केली. 'शिशिरागम', 'काही कविता' व 'आणखी काही कविता' हे त्यांचे काव्यसंग्रह. 'मर्ढेकरांची कविता' या संग्रहात त्यांच्या सर्व कवितांचा समावेश केला आहे. यांशिवाय 'नटश्रेष्ठ आणि चार संगीतिका', 'सौंदर्य आणि साहित्य' ही त्यांची पुस्तके. 'पाणी', 'तांबडी माती' या त्यांच्या कादंबऱ्या.

ही कविता 'मर्ढेकरांची कविता' या संग्रहातून घेतली आहे. आषाढ-श्रावणातील पावसामुळे वातावरण कसे प्रसन्न होते, त्याचा अनुभव या कवितेतून तुम्हांला येईल.

---

आला आषाढ-श्रावण
आल्या पावसाच्या सरी;
किती चातकचोचीने
प्यावा वर्षाऋतू तरी!

काळ्या ढेकळांच्या गेला
गंध भरून कळ्यांत;
काळ्या डांबरी रस्त्याचा
झाला निर्मळ निवांत.



चाळीचाळीतून चिंब
ओली चिरगुटे झाली;
ओल्या कौलारकौलारी
मेघ हुंगतात लाली.

ओल्या पानांतल्या रेषा
वाचतात ओले पक्षी;

आणि पोपटी रंगाची
रान दाखविते नक्षी.

मनी तापलेल्या तारा
जरा निवतात संथ;
येता आषाढ-श्रावण
निवतात दिशा-पंथ.

आला आषाढ-श्रावण
आल्या पावसाच्या सरी;
किती चातक-चोचीने
प्यावा वर्षाऋतू तरी!

**शब्दार्थ व टिपा :**

**ढेकळांचे कळे**—मोठ्या कळ्यांसारखी दिसणारी मातीची ढेकळे. **कौलार-कौलारी**—प्रत्येक कौलारू छपरातील. **तापलेल्या तारा**—दुःख; चिंता; संताप.

**चातक**—या पक्ष्यासंबंधी अशी समजूत आहे, की तो ढगांतील पाणी पिऊन राहतो आणि म्हणून ढगांची आतुरतेने वाट पाहतो.

**प्रश्न :**

१. आषाढ-श्रावणातील पावसाबद्दल कवीला वाटणारी आतुरता कोणत्या ओळींतून व्यक्त होते?
२. आषाढ-श्रावणाच्या आगमनाने काय काय निवते?
३. या कवितेत पावसाळी वातावरण कोणकोणत्या तपशिलांतून जाणवते?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. आषाढ-श्रावणात निसर्गाची एक आगळी शोभा दिसते. तिचे वर्णन करा.
२. बालकवींची 'श्रावणमास' व पद्मा गोळे यांची 'श्रावणराज' या कविता मिळवा व वाचा.

★ ★ ★



# ६. चंदन

## कृ. ब. निकुंब

**कृष्ण बळवंत निकुंब** (जन्म : १९२०) मराठी विषयाचे प्राध्यापक. 'उज्ज्वला', 'ऊर्मिला', 'सायसाखर', 'अनुबंध' हे त्यांचे काव्यसंग्रह.

ही कविता 'अनुबंध' या संग्रहातून घेतली आहे. चंदनासारख्या झिजणाऱ्या व मुलाचे जीवन आनंदित करणाऱ्या वृद्ध आईबद्दल त्याला वाटणारी आपुलकी व कृतज्ञता या कवितेत व्यक्त झाली आहे.

---

माझ्या अंदनी खोडाचा
मंत्र : 'झिजणे-झिजणे!'
उणे लिंपायला माझे
घाली सुगंधाचे लेणे.

झीज केशरी तयाची
तप्त जीवा लावी उटी
आत उमले भावना
शांत, शीतल, गोरटी!

माझे सुख, माझी तृप्ति
हीच देवपूजा त्याची



निष्काम ते; अपवाद
इच्छा एक झिजायाची!

झिजते ते — जीव माझा
होतो आत आत गोळा
अडखळे हात आणि
पाणी तरारते डोळां

वृद्‌ध चंदन ते माझे
नित्य जपले, जपेन
त्याच्यासाठी, आण त्याची
जीव ठेवीन गहाण!

## शब्दार्थ व टिपा :

**उणे**—अपुरेपणा. **लेणे**—दागिना; अलंकार. **गोरटी**—सुंदर. **निष्काम**—फळाची अपेक्षा नसलेले; निरपेक्ष.

**जीव गोळा होणे**—कासावीस होणे; व्याकूळ होणे. **जीव गहाण ठेवणे**—सर्वस्व अर्पण करणे.

**चंदनी खोड**—वृद्‌ध आईला उद्‌देशून म्हटले आहे. आपल्या मुलाबाळांसाठी चंदनाच्या खोडासारखी ती सतत झिजत असते.

## प्रश्न :

१. आई मुलासाठी सारखी कष्ट करते हे कोणकोणत्या ओळींतून जाणवते?
२. आईचे कष्ट निरपेक्ष असले तरी तिची कोणती एकच इच्छा असते?
३. आईबद्‌दलची भावना कवीने कोणत्या शब्दांत व्यक्त केली आहे?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. या कवितेत आईचे वात्सल्य जागोजागी जाणवते. त्याआधारे 'मातृप्रेम' या विषयावर निबंध लिहा.
२. महाराष्ट्र-कवी यशवंत यांची 'आई' ही प्रसिद्‌ध कविता मिळवा व वाचा.

★ ★ ★



# ७. हळद उन्हाची

**सदानंद रेगे**

**सदानंद शांताराम रेगे** (जन्म: १९२३; मृत्यू: १९८२) इंग्रजी विषयाचे प्राध्यापक. 'अक्षरवेल', 'गंधर्व' हे त्यांचे काव्यसंग्रह. 'चंद्र सावली कोरतो' हा कथासंग्रह. याशिवाय त्यांनी परकीय नाटकांची भाषांतरेही केली आहेत.

ही कविता 'अक्षरवेल' या संग्रहातून घेतली आहे. दुपारचे हळदी रंगाचे रणरणते ऊन जेव्हा पसरते तेव्हा कोणती मनोहर दृश्ये बघायला मिळतात, त्याचे चित्रण या कवितेत आढळते.

झाडांच्या शेंड्यांवरती
हळद उन्हाची खळ्खळ्ते
वाऱ्याच्या पंखांवरती
पिंपळपालवि सळ्सळ्ते.

होडीच्या शीडावरती
एक पाखरू किल्बिल्ते
काठाच्या देठावरती
खुळी मासळी झिळ्मिळ्ते.

वाळूच्या दुलईवरती
निळी शिंपली हुरहुर्ते
माळाच्या भाळावरती
पिंवळे जावळ भुर्भुर्ते.

क्षितिजाच्या धारेवरती
भुरी टेकडी झुरझुर्ते

पिंगट कौलारावरती
वेल धुराची सर्‌सर्‌ते.

पाण्याच्या पाठीवरती
वर्तुळ लाडिक थर्‌थर्‌ते
स्वप्नांच्या वाटेवरती
मनात काही शिर्‌शिर्‌ते.

## शब्दार्थ व टिपा :

**हळद उन्हाची**—दुपारचे हळदी रंगाचे ऊन. **काठाच्या देठावरती**—काठाच्या आधाराने. **खुळी**—भान हरपलेली. **झिळ्‌मिळ्‌ते**—हालचाल झाली की उन्हामुळे चमचमते. **दुलई**—रजई; आत कापूस घालून तयार केलेले पांघरूण. **भाळ**—कपाळ. **जावळ**—लहान मुलाच्या डोक्यावरचे मूळचे केस. (कवितेत—गवत या अर्थी). **क्षितिजाची धार**—क्षितिजाची रेषा, कडा.

**स्वप्नांच्या वाटेवरती... शिर्‌शिर्‌ते**—कवितेत वर्णन केलेली सुंदर दृश्ये पाहताना आपल्याला जणू स्वप्नच पडत आहे, असा कवीला भास होतो आणि त्यामुळे तो रोमांचित होतो.

## प्रश्न :

१. उन्हाचे वर्णन कवीने कोणत्या शब्दांत केले आहे?
२. होडी व नदीचा काठ यांचे चित्र कोणते तपशील देऊन रेखाटले आहे?
३. गवताला 'जावळ' का म्हटले आहे?
४. क्षितिजाच्या कडेला कवीला कोणते दृश्य दिसते?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. 'निळी शिंपली' यात रंग व त्या रंगाची वस्तू अशी जोडी आली आहे. अशा काही जोड्या कवितेत शोधून त्यांचे टिपण करा.
२. या कवितेत एक सुंदर चित्र डोळ्यांपुढे उभे राहते. त्याचे वर्णन लिहा.
३. 'खळ्‌खळ्‌ते', 'सळ्‌सळ्‌ते' असे शब्द कवितेत आले आहेत. त्यांची यादी करा आणि त्या शब्दांमुळे कवितेची गोडी कशी वाढली आहे, ते समजून घ्या.

★ ★ ★



# ८. खुणा

**इंदिरा**

**इंदिरा नारायण संत** (जन्मः १९१४) कवयित्री, कथालेखिका. 'शेला', 'मृगजळ', 'रंगबावरी', 'बाहुल्या', 'गर्भरेशीम' हे त्यांचे काही काव्यसंग्रह. 'शामली', 'कदली' हे कथासंग्रह. कौटुंबिक जीवनातील सुखदुःखे आणि निसर्गाबद्दल वाटणारा जिव्हाळा त्यांच्या कवितेतून व्यक्त होतो.

ही कविता 'शेला' या संग्रहातून घेतली आहे. लाल रस्त्यावर उमटणाऱ्या पावलांच्या व वाहनांच्या खुणा कवयित्रीने आपल्या हृदयात किती हळुवारपणे जपून ठेवल्या आहेत, याचे चित्रण या कवितेत केले आहे.

---

लाल मऊ धुळीतील
उमटली खूण खूण
माझ्या अंतरीचा ठेवा
पहा गडे न्याहाळून.

बघ इथे उमटली
चाके कशी दुचाकीची
नक्षी किती सुकुमार
किनारच पातळाची.

बाळ कोणी धावलासे
ओढ लागून घराची
इथे पाऊले गोजिरी
बघ दुडक्या चालीची.

शेळ्या मेंढ्यांचा कळप
आला बघ घसाघसा
गोजिऱ्या त्या पावलांचा
साठवावा कसा ठसा?

सरसर आली पाने
फेर धरून नाचली
नाजूक ही त्यांची खूण
किती जपून ठेवली!

लाल मऊ धुळीतील
उमटली खूण खूण
माझ्या अंतरीचा ठेवा
पहा गडे न्याहाळून --

**शब्दार्थ व टिपा :**

**अंतरीचा ठेवा** --अंतःकरणात जपून ठेवलेली मूल्यवान गोष्ट.

**प्रश्न :**

१. कवयित्रीला 'अंतरीचा ठेवा' कोणता वाटतो?
२. दुचाकीच्या चाकांच्या खुणा पाहून कवयित्रीला कोणती आठवण येते?
३. कुणाकुणाची पावले त्या लाल धुळीत उमटलेली आहेत?
४. कोणत्या खुणेला कवयित्री 'नाजूक' म्हणते? का?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. 'खूण खूण' म्हणजे प्रत्येक खूण, तसेच 'घर घर' म्हणजे प्रत्येक घर. असे आणखी शब्द तयार करा आणि त्यांचा वाक्यांत उपयोग करा.
२. धुळीत उमटणाऱ्या खुणा ही तशी किती सामान्य गोष्ट! पण कवयित्रीला त्यांचे फार महत्त्व वाटते. अशा लहान लहान गोष्टींनीही जीवन आनंदी बनते. 'साध्यासुध्या गोष्टींचे मला वाटणारे महत्त्व' या विषयावर वक्तृत्व-स्पर्धा आयोजित करा.

★ ★ ★



# ९. संथ निळे हे पाणी

**मंगेश पाडगावकर**

**मंगेश केशव पाडगावकर** (जन्म : १९२९) स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या काळातील कवी. निसर्गसौंदर्याचे चित्रण हा त्यांच्या कवितेचा एक विशेष. 'धारानृत्य', 'जिप्सी', 'छोरी', 'मीरा', 'सलाम' हे त्यांचे काही कवितासंग्रह.

ही कविता 'जिप्सी' या संग्रहातून घेतली आहे. निसर्गातील एखाद्या दृश्याचा परिणम कविमनावर कसा होतो याचे चित्र या कवितेत रेखाटले आहे.

संथ निळे हे पाणी
वर शुक्राचा तारा
कुरळ्या लहरींमधुनी
शीळ घालितो वारा.



दूर कमान पुलाची
एकलीच अंधारी
थरथरत्या पाण्याला
कसले गुपित विचारी?

भरुन काजव्यांनी हा
चमके पिंपळ सारा
स्तिमित होउनी तेथे
अवचित थबके वारा!



किरकिर रातकिड्यांची
नीरवतेस किनारी
ओढ लागुनी छाया
थरथरती अंधारी!

मधेच क्षितिजावरुनी
वीज लकाकुनि जाई
अन् ध्यानस्थ गिरीही
उघडुनि लोचन पाही!

संथ निळे हे पाणी
वर शुक्राचा तारा
दरवळला गंधाने
मौनाचा गाभारा!

**शब्दार्थ व टिपा :**

**स्तिमित**—चकित. **नीरवता**—कमालीची शांतता. **ध्यानस्थ**—ध्यान करण्यासाठी आसन घालून स्थिर बसलेला.

**किरकिर----किनारी**—रातकिड्यांच्या किरकिरण्यामुळे रात्रीची शांतता अधूनमधून भंग पावत होती. **दरवळला गंधाने मौनाचा गाभारा**—रात्रीच्या सौंदर्याचा कवीच्या मनावर इतका खोलवर प्रभाव पडला आहे, की आपल्याला झालेला आनंद तो शब्दांत व्यक्त करू शकत नाही, तो मूक राहतो.

**प्रश्न :**

१. कवितेत वर्णन केलेले दृश्य कोणत्या वेळचे आहे? ती वेळ कोणकोणत्या शब्दांतून लक्षात येते?
२. पूल, पिंपळ, वारा, वीज, गिरी यांचे वर्णन सजीव असल्याप्रमाणे केले आहे, हे कोणकोणत्या तपशिलांतून जाणवते?
३. या शांत दृश्याचा कवीच्या मनावर कोणता परिणाम झाला?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. या कवितेत शुक्राच्या ताऱ्याचा उल्लेख आहे. इतरही ताऱ्यांची माहिती मिळवा आणि त्यांचे निरीक्षण करण्यातला आनंद लुटा.
२. या कवितेच्या साहाय्याने नदी, पुलाची कमान, किनाऱ्याजवळचा पिंपळ, दूरवर दिसणारे पर्वत यांपैकी कोणत्याही एकाचे चित्र काढा व ते रंगवा.

★ ★ ★



# १०. सुतारपक्षी

**वसंत सावंत**

**वसंत लाडोबा सावंत** (जन्म : १९३५) नव्या पिढीतील कवी. 'स्वस्तिक', 'उगवाई' हे त्यांचे कवितासंग्रह.

सागाच्या खोडात जिद्दीने ढोल कोरत असलेला चिमुकला सुतारपक्षी पाहून आपल्या मनातील खिन्नता दूर झाली, हा अनुभव कवीने येथे सांगितला आहे.



साग भरला आभाळी
जाय पालवून नभा
खिन्न दिशा, दिगंत नि
सुन्न बागेत मी उभा

गारठल्या मनी, पानी
कुठे नव्हतीच जाग
एकाएकी ठोक...ठोक...
टणत्कार, नादवेग

साग स्वयंभू शहारे
असे घाव त्याच्या टोका
थरारली नीरवता
असा ऐकिला मी ठोका

लाल तांबडा नि काळा
फेटा डोईवर उभा
तीक्ष्ण धारेच्या चोचीने
जणू कोरितो हा नभा

दूर सागाच्या खोडाला
ढोल कोरीत सुतार
त्याची जिद्द नि ताकद
गेली सांगून अपार

इवलाल्या जिवाचे हे
उष्ण धारोष्ण जगणे
निवळले मन माझे
दिशापुत्राच्या दर्शनि

## शब्दार्थ व टिपा :

**दिगंत**—दिशांचा शेवट; क्षितिज. **नादवेग**—वेगाने एकसारखा होणारा आवाज. **स्वयंभू**—आपोआप उत्पन्न झालेला; स्वाभाविकपणे. **उष्ण धारोष्ण**—ताजेतवाने; टवटवीत.

**दिशापुत्र**—सुतारपक्षी सर्व दिशांत संचार करतो, म्हणून त्याला 'दिशापुत्र' म्हटले आहे.

## प्रश्न :

१. कवी कुठे उभा होता? त्याची मनःस्थिती कोणत्या शब्दांतून व्यक्त होते?
२. 'ठोक...ठोक' या आवाजाचा काय परिणाम झाला?
३. कवीने सुतारपक्ष्याचे वर्णन कोणत्या शब्दांत केले आहे?
४. कवीचे मन कशामुळे निवळले?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. या कवितेत अर्थपूर्ण शब्दयोजना केली आहे. उदा. 'थरारली नीरवता'. अशाच आणखी शब्दयोजना शोधून काढा आणि त्यांचे अर्थ समजून घ्या.
२. '--- गेली सांगून अपार' या ओळीत काय सांगून गेली हे कवी सांगत नाही. ते तुम्हांला कळेल असे त्याला वाटते. ते काय असेल यासंबंधी दोन-तीन वाक्ये वहीत लिहा.
३. 'पावशा', 'टिटवी' असे काही विशिष्ट आवाज करणारे पक्षी आहेत. त्यांची माहिती व चित्रे मिळवा.

★ ★ ★



# ११. असेल हिंमत लढणारांची

**नारायण सुर्वे**

**नारायण गंगाराम सुर्वे** (जन्म : १९२६) कामगारांची, दलितांची सुखदुःखे आपल्या आवेशपूर्ण भाषेत कवितेतून चित्रित करणारे कवी. 'ऐसा गा मी ब्रम्ह' 'माझे विद्यापीठ', 'जाहीरनामा', 'सनद' हे त्यांचे काव्यसंग्रह.

ही कविता 'ऐसा गा मी ब्रम्ह' या संग्रहातून घेतली आहे. विषमता, अन्याय, जुलूम यांच्याविरुद्ध हिंमत बांधून लढण्यासाठी कवी आवाहन करत आहे.

---

असेल हिंमत लढणारांची
आणि सुळावर चढणारांची,
निर्भय निधड्या छातीवरती
जुलूम रगडित जाणारांची
त्याने यावे —

कसले भेद नि खुरटे वारे?
मोजित बसला वरचे तारे!
चुलीत ज्यांच्या विस्तव नाही
तेथे फुलतिल कसे निखारे?
उगा रुसावे —

रोज बडविती नवेच ढोल,
हवेत जिरती फुसके बोल,
थंडे ताबुत झाले तरिही
उगाच बसले घालित घोळ
किती दळावे —



हरला असेल त्याने यावे
अन्यायावर तुटुन पडावे,
पिडला असेल त्याने यावे
आणि व्यथेवर औषध न्यावे —

खचला असेल त्याने यावे
बोल धिराचे मनन करावे
वंचित असेल त्याने यावे
स्वतःस फुंकुन पावन व्हावे.

लखलखत्या पात्यांनी यावे,
घरघरत्या जात्यांनी यावे,
अणूअणूच्या कणाकणातुन
उसळत धुमसत पेटत यावे.

जाळित जावे, घडवित यावे,
संहारावे, उभवित यावे,
विराट श्रमसूर्याच्या कक्षी
स्वतःस उजळित मुक्त फिरावे!

**शब्दार्थ व टिपा :**

**वंचित** – मुकलेला; पारखा झालेला. **संहारावे** –नष्ट करावे.

**सुळावर चढणे** –उच्च ध्येयासाठी स्वेच्छेने प्राणार्पण करणे. **ताबूत थंडे होणे** –आवेश ओसरणे.

**श्रमसूर्य** –सूर्यामुळे सर्व जगाला जीवन प्राप्त होते. त्याप्रमाणे श्रमांतून सर्वांचे जीवन फुलते, म्हणून श्रमाला 'सूर्य' म्हटले आहे.

**प्रश्न :**

१. अन्यायाविरुद्ध लढण्यासाठी कवी कोणाकोणाला आवाहन करत आहे?
२. फुसक्या बोलांपेक्षा प्रत्यक्ष कृतीची का गरज आहे?
३. पिडलेल्यांचे दुःख निवारण्याचा कोणता उपाय सुचवला आहे?
४. श्रमसूर्याच्या कक्षेत मुक्त फिरावे अशी इच्छा कवी कशासाठी व्यक्त करतो?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. 'लखलखती पाती', 'घरघरती जाती' हे शब्दप्रयोग कवीने योजले आहेत. त्यांतले सौंदर्य समजून घ्या..
२. 'उसळत घुमसत पेटत यावे' या ओळीतील नादमधुरता, लयबद्धता आणखी कोणत्या ओळींत आढळते ते शोधा.
३. 'बिजली नाचेल गगनात' हे कवी वसंत बापट यांचे गीत मिळवा.
४. ही कविता चालीवर सामूहिक रीतीने म्हणा.

★ ★ ★



# १२. नलराजा आणि हंस

**रघुनाथपंडित**

**रघुनाथपंडित** —जन्म-मृत्यू यासंबंधी निश्चित माहिती उपलब्ध नाही. शिवकालीन पंडित कवी. 'नल-दमयंती स्वयंवर', 'गजेंद्रमोक्ष' व 'रामदासवर्णन' ही त्यांची ग्रंथसंपदा.

हा उतारा 'नल-दमयंती स्वयंवर' या आख्यानातून घेतला आहे. हंसाला नलराजाने पकडल्यानंतर तो मनुष्यवाणीने त्याच्याशी काय बोलतो व त्यानंतर काय घडते हे या उताऱ्यात वाचा.

---

न सोडी हा नळ भूमिपाळ मातें। असें जाणोनी हंस वदे त्यातें ।।
"हंसहिंसा नच घडो तुझ्या हातें। स्वस्थळातें पावेन पक्षपातें ।।

पदोपदीं आहेत वीर कोटी। भले झुंझार शक्ति जयां मोठी ।।
तयां माराया धैर्य धरीं पोटीं। पांखरूं हें मारणें बुद्धि खोटी ।।



म्हातारी उडतां नयेचि तिजला माता मदीया अशी।
कांता काय वदों, नव-प्रसव ते सातां दिसांची तशी।।
पाता त्या उभयांस मी, मज विधी घातास योजीतसे।
हातामाजि नृपा तुझ्या गवसलों आता करावें कसें"।।

येणेंपरी परिसतां अति दीन वाचा।
हेलावला नळ पयोधि दयारसाचा।।
सोडी, म्हणे, "विहर जा अथवा फिराया।
राहें यथा-निज-मनोरथ हंसराया"।।



सुटुनि खग पळाला बैसला शालशाखे।
क्षणभरि निजदेहीं मुक्तिविश्रांति चाखे ।।
स्वजन तंव तयाचे भोंवताले मिळाले।
कवळिति निजबंधू बाष्पबिंदू गळाले ।।

विसावा घे कांहीं उडुनि लवलाहीं परतला।
नृपाळाचे स्कंधीं बसुनि मणिबंधीं उतरला ।।
म्हणे हंस क्षोणीपतिस, "तुज कोणी सम नसे।
दयेचाही ठेवा तुजजवळि देवा बहु वसे"।।

**शब्दार्थ व टिपा :**

**भूमिपाळ**—राजा. **मातें**—मला. **पक्षपातें**—उडून. **मदीया**—माझी. **कांता**—पत्नी. **ते**—ती. **पाता**—पालन करणारा. **विधी**—ब्रम्हदेव. **वाचा**—वाणी. **हेलावला**—उचंबळला. **पयोधी**—समुद्र. **यथा-निज-मनोरथ**—इच्छेस येईल त्याप्रमाणे. **शालशाखे**—वृक्षाच्या फांदीवर. **मुक्तिविश्रांती**—सुटका झाल्यामुळे प्राप्त झालेली विश्रांती. **कवळिती**—आलिंगन देतात. **बाष्पबिंदू**—अश्रू. **लवलाहीं**—ताबडतोब. **मणिबंधीं**—मनगटावर. **क्षोणीपती**—पृथ्वीपती; राजा.

**प्रश्न :**

१. नलराजाकडून सुटका करून घेण्यासाठी हंसाने कोणती कारणे दिली?
२. राजाचे अंतःकरण का हेलावले?
३. राजाने हंसाला काय करायला सांगितले?
४. सुटकेनंतर हंसाने काय केले?
५. तो राजाला काय म्हणाला? त्या उद्‌गारातून हंसाचा कोणता स्वभाव दिसून येतो?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. नल-दमयंती ही कथा मिळवा.
२. या कवितेत वेगवेगळे रचना-प्रकार आले आहेत. प्रत्येक रचना-प्रकाराची विशिष्ट चाल आहे, ती शिक्षकांकडून समजून घ्या आणि त्या त्या चालीवर कविता म्हणा.

* * *



# १३. संतवाणी

## नामदेव

**नामदेव :** (जन्म : १२७०; निर्याण : १३५०) संतकवी. भागवत धर्माचे प्रचारक. या धर्माचा प्रसार महाराष्ट्रात व पंजाबातही त्यांनी केला. शिखांच्या 'ग्रंथसाहेब' या धर्मग्रंथात त्यांचे काही अभंग समाविष्ट केले आहेत.

पुढील अभंगात वृक्ष व संत यांतील साम्य त्यांनी सांगितले आहे.

---

जैसा वृक्ष नेणे मान अपमान। तैसे ते सज्जन वर्तताती ।।
येऊनियां पूजा प्राणि जे करिती। त्याचें सुख चित्तीं तया नाहीं ।।
अथवा कोणी प्राणी येऊनि तोडिती। तया न म्हणती छेदूं नका ।।
निंदास्तुति सम मानिती जे संत। पूर्ण धैर्यवंत साधु ऐसे ।।
नामा म्हणे त्यांची जरी होय भेटी। तरी जीव शिवा गांठी पडूनि जाय ।।

---

## सेना

**सेना :** जन्म व निर्याण यांसंबंधी निश्चित माहिती उपलब्ध नाही. संत नामदेवांचे समकालीन. त्यांची अभंगरचना 'सकल-संतगाथा'मध्ये समाविष्ट केली आहे.

पुढील अभंगात माणसाचा घात व हित होण्याची कारणे सांगितली आहेत.

---

करितां परोपकार। त्याच्या पुण्या नाहीं पार ।।
करितां परपीडा। त्याच्या पाया नाहीं जोडा ।।
आपुलें परावें समान। दुजा चरफडे देखून ।।
आवडे जगा जें कांहीं। तैसें पाहीं करावें ।।
उघडा घात आणि हित। सेना म्हणे आहे निश्चित ।।

## एकनाथ

**एकनाथ :** (जन्म : १५३३; निर्याण : १५९९) संतकवी. त्यांनी महाराष्ट्रात भागवत धर्माचा प्रसार केला. 'एकनाथी भागवत', 'भावार्थ रामायण', 'रुक्मिणी-स्वयंवर' हे ग्रंथ. अभंग, गौळणी व भारुडे इत्यादी विपुल रचना 'एकनाथ-गाथा' या त्यांच्या ग्रंथात संग्रहित केली आहे.

पुढील अभंगात अमंगळ वाणी कोणती हे एकनाथांनी सांगितले आहे.

---

सांगे बहु सोपया गोष्टी। करूं नेणो तो हातवटी।।
ऐसें याचें नको ज्ञान। ज्ञान नोहे तें पतन।।
सांगे लोकां उपदेश। आपण नेणें तो सायास।।
शरण एका जनार्दनीं। त्याची अमंगळ वाणी।।

---

## शेख महंमद

**शेख महंमद :** (जन्म : १५६५; निर्याण : सन अनिश्चित) संतकवी. एकनाथांचे समकालीन. 'योगसंग्राम', 'निष्कलंक-बोध' व 'पवन-विजय' ही त्यांची ओवीबद्‌ध रचना. याशिवाय अनेक अभंग त्यांनी लिहिले.

पुढील अभंगात साधूच्या अंतरंगाचे दर्शन घडवले आहे.

---

केकतीला कांट्याचे वेढे। भितरीं निपजती केवडे।
तैसे साधूचे शब्द गाढे। परोपकारालागीं।।
फणस सर्वांगीं कांटवले। भितरीं महा गोडीनें कोंदले।
तैसें साधुहृदय जालें। बोधासंगें परियेसा।।
नारळ कठीण दिसे बाहेर। भितरीं खोबरें अरुवार।
तैसें साधूचें अंतर। बोधें वोसंडले।।
ऐसा सद्‌गुरुशीं धरा भाव। तो कैसा करावा उपाव।
शेखमहंमद सांगती सेव। सभे श्रोत्यांप्रती।।



## शब्दार्थ व टिपा :

**छेदणे** – तोडणे. **शिव** – ईश्वर. **परावें** – दुसऱ्याचे. **सोपया** – सोप्या. **हातवटी** – हातोटी; कौशल्य. **भितरीं** – आतल्या बाजूस. **कांटवणे** – (अंगावर) काटे असणे. **कोंदले** – दाटले; भरले. **परियेसा** – ऐका. **अरुवार** – मऊ. **सेव** – सेवा.

## प्रश्न :

१. वृक्ष आणि संत यांच्यातील सारखेपणा कोणता?
२. कशामुळे घात होतो आणि कशामुळे हित होते, असे संत सेना सांगतात?
३. कोणती वाणी 'अमंगळ' असे संत एकनाथांना वाटते?
४. साधूच्या अंतरंगाचे वर्णन करण्यासाठी शेख महंमद यांनी कोणती उदाहरणे दिली आहेत?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. 'करिता परोपकार। त्याच्या पुण्या नाहीं पार॥' अशा प्रकारची सुभाषितवजा रचना संतांच्या अभंगांत येते. अशा काही रचना मिळवून त्यांचा संग्रह तयार करा.
२. ज्ञानेश्वर ते तुकाराम ही महाराष्ट्राची संतपरंपरा आहे. या परंपरेत अनेक जाति-धर्मांतील संत होऊन गेले आणि त्यांनी समान शिकवण दिली. यासंबंधी माहिती मिळवा.
३. हे अभंग योग्य चालीवर, जरूर त्या साथीसह सामुदायिक रीतीने म्हणा.

★ ★ ★

